85

श्री. शां. गो. गुप्ते कृत.

# रणरागिणी

[ ऐतिहासिक नाटक. ]

७८६९०२

लेखक,

श्री. शांताराम गोपाळ गुप्ते.

"हिरा हरपला" "तंट्या भिल्ल" इत्यादि नाटकांचे कर्ते.



कि. १-४-०

द्वितियावृत्ति ] [ ~~किंमत १ रुपया~~

# बाळे रण-रागिणी !—

बरोबर पासष्ट वर्षांपूर्वींचे तुझे पिताजी मोरोपंत तांबे आज हयात नाहींत. तुझाहि नाशिवंत देह, तुझ्या कर्तृत्वाची मोहन छबी प्रत्येक इतिहास भक्ताच्या हृदयांत अजरामर अशी उभी करून कालवश झाला; पण आज पुन्हां तुला "बाळे" अशी वात्सल्यप्रेमानं हाक मारण्याचं भाग्य मला मिळालं! या जगांतला तुझा जन्म तुला मोरोपंतांनीं दिला, पण तुझ्या दिव्य कर्तृत्वाची संजीवनी करून, तुझी साधारण कां होईना, मूर्ति नाट्य—सृष्टींत उभी करण्यास मी कारणीभूत झालों ! नाट्य, कल्पना आणि उपलब्ध असलेली कार्य-सामुग्री या त्रयींचा प्रमाणांत मिलाफ करतांना क्वचित्-प्रसंगीं नाट्याकरतां सत्याला दूर सारून, कल्पनेकडे धांव घ्यावी लागली तर क्वचित् ठिकाणीं इतिहासालाच महत्त्व देणें जरूर असल्यामुळं, नाट्याला दृष्टीआड करावं लागलं ! त्याचप्रमाणें इतिहासांत नाट्याच्या दृष्टीनं विस्कळीत असलेला तत्कालीन कथाभाग सरळ रेषेंत मांडण्याकरतां,—तुझ्या प्रभावळींत निरनिराळे रंग भरतांना, सत्याबरोबरच कल्पनामय रंगाचा उठाव तींत भरावा लागला !—काल्पनिक सुंदरलाल, कामिनी, हेस्टी यांच्या निरनिराळ्या प्रसंगांचा भडकपणा नाट्याकरतां तर आहेच पण सत्यसृष्टीलाहि तो फारसा सोडून नाहीं !—तत्कालिन जनानी गोषा बाजूला सारून, द्वितीय—अंकाच्या शेवटीं तुझा प्रवेश भरदरबारांत दाखवला आहे याबद्दल मला मराठी इतिहासकारांचा जरी नसला तरी नाट्याचा आणि ( Medows Teller ) मेडोज् टेलर या इंग्रज गृहस्थाच्या पुढील वाक्यांचा तात्पुरता तरी आधार आहे.

"The Ranee Lukshumee Bye, a maratha Bramhin lady had no affection of personal Concealment." ( SEETA. PAGE 247.) यामुळं किंवा एखाद्या साधनाच्या अभावीं, तुझी मूर्ति कल्पनेच्या कुंचलीनं रेखाटतांना भलत्याच ठिकाणीं तुला वैगुण्य आलें असेल किंवा एखादा भलताच आरोप तुझ्यावर केला गेला असेल तर त्याची मी मनःपूर्वक तुला क्षमा मागतों !

रण–रागिणी ! " युवती " आणि " रणांगण " या भिन्न कल्पना एके ठिकाणीं करतांना परस्पर विरोधी भावनांचा जितका गोंधळ होतो तितकाच गोंधळ " रण–रागिणी " आणि " झंकार " या दोन कल्पनांचा जरी असला तरी पण रण-रागिणी, तूं नेपोलियन नव्हेस, तैमूरलंग नव्हेस किंवा औरंगजेबहि नव्हेस !

कोमल विचारांची, पवित्र आचारांची तूं एक स्त्री आहेस ! पुरुषांच्या सहजसिद्ध कठोरपणा कर्तव्याच्या आंचीमुळं तुझ्यांत आला ! जात्या कोमल पण कर्तव्यामुळं कठोर बनलेल्या जिवाच्या कृतीला कठोर शब्दानं संबोधणं म्हणजे त्या कृतीचा विपर्यास करण्यारखं आहे ! शृंगार-रसांत तुझं चरित्र लिहिण्याचा प्रसंग मला आला असतां तर शृंगार मंदिरांतल्या तुझ्या नुपुर-झंकाराबद्दल कोणालाच शंका आली नसती ! पण दुर्दैवानं शृंगाराऐवजीं रणरंग तुझ्या ललाटीं आला ! नेपोलिअनच्या रणरंगाला "दणदणाट"ही शब्द योजना योग्य होईल पण तुझ्या सारख्या स्त्रीच्या मर्दाईला कोमल शब्दानंच संबोधायला नको कां ? साहित्याला सोडल्याप्रमाणं प्रथम वाटेल परंतु साहित्याचा संबंध जर मनोभावनांशीं आणि परिस्थितीशीं येत असेल तर तुझ्यासारख्या स्त्रीच्या "दणदणाटाला" " झंकार " अशा "संगीत" उपमेनंच संबोधण मला योग्य वाटतं !—

दुर्दैवी बाळे, इहलोकचा तुझा जीवनक्रम निराशेशीं झगडतांना संपला. दुर्दैवाच्या दर्यात यशाची नौका सांपडेल या फोल आशेनं, त्या दुर्दैवाच्या लाटांशीं झुंजतां झुंजतां, तुझा अभागी आत्मा अनंतात विरून गेला ! तरी सुद्धां दुर्दैवानें तुझा पाठपुरावा सोडला नाहीं ! रंगभूमीवर तुझा जन्म एकाद्या दुर्दैवी पोराप्रमाणं दैन्यांत झाला ! लक्ष्मी, रंगदेवीच्या रणांगणांत तुझा जन्म होतांना–तुझ्या स्वर्गस्थ आत्म्याच्या पुण्याईमुळं–तुझ्या नाट्य–चरित्राला आलेली अपूर्व उसळी पाहण्याचं भाग्य मला मिळालं नाहीं !–तुझी नाट्यमाता तुझ्या पित्याला विसरली पण तूं मात्र आपल्या मातेला विसरूं नकोस !

रण–रागिणी ! शेकडों अडथळे दूर सारून " गणेश नाटक मंडळीच्या रंगभूमीवर तुझं पाऊल पडण्यास आणि " गणेश " राज्याची रा. वामन-

राव पोतनीस आणि शिवरामपंत परांजपे यांच्यात हातीं असणारीं सूत्रं बरोबरीच्या नात्यानं रा. माधवराव टिपणीस यांच्याहि हातीं पाडण्याचा योगायोग जुळून आला आहे !—तुला नाट्य–सृष्टींत उत्साहाच्या उतावीळपणानं जन्म दिल्याबद्दल रा. पोतनीस, परांजपे व टिपणीस यांचा मी अत्यंत आभारी आहे! त्याचप्रमाणं दिवसेंदिवस बिकट होत जाणाऱ्या नाट्यसंसाराला उल्हासानं कमर कसून सन्मुख झाल्याबद्दल "गणेश दरबारच्या" या नूतन त्रिमूर्तींचं त्याचप्रमाणें मंडळीचे कार्यवाह श्री. रा. रा. शांतारामजी शामराव ढगे यांचें अभिनंदन करणें जरूर आहे ! बाळे, तुझ्या अपूर्णावस्थेंत ज्या प्रेमळ सुहृदाची तुझ्यावरून गोड कृपादृष्टी फिरली ते माझे मित्र कवि श्रीयुत रा. रा. सदाशिवराव अनंत शुक्ल यांचा त्याचप्रमाणं तुझं शब्दचित्र मनोहर व टिकावू करण्याकरतां आपलीं छायाचित्रें आनंदानं दिल्याबद्दल "गणेश नाटक मंडळी" चा मीं आभारीं आहे ! शेवटीं संकटाच्या वणव्यांत परंतु पंढरपूरच्या विठोबाच्या परमपवित्र चरणीं तुझा जन्म ज्या उसळीनं आणि जोमानं झाला तीच उसळी आणि जोम त्या दयामय विठोबाच्या कृपेनं कायम राहून तूं 'चिरायु' हो असा आशीर्वाद देण्यापलीकडे या तुझ्या शब्द सृष्टींतल्या पित्याला अधीक काय करतां येणार ?

तुझा,

**शांताराम गोपाळ गुप्ते.**

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

आज पंधरा वर्षांनंतर पुन्हां माझ्या या आवडत्या नाटकाची द्वितीयावृत्ति काढण्याचा सुयोग येत आहे आणि त्याच वेळीं पुन्हां "राष्ट्रसेवक नाटक मंडळी" कडून या नाटकाचे प्रयोग सुरू होत आहेत. हिंदुस्थान सरकारनें १९२४ सालीं या नाटकास बंदी केली होती. पण काँग्रेस सरकारच्या अमदानींत या नाटकावरील बंदी उठली आहे आणि तें पुन्हां प्रयोगरूपानें आणि पुस्तकरूपानें प्रकाशांत येत आहे आणि त्यामुळें वात्सल्यभरानें माझें अंतःकरण भरून आलें आहे.

नटवर्य श्री. **शिवरामपंत परांजपे,** श्री. सितारामपंत जोशी, श्री. जोगळेकर, राजे पेंटर, **हिंदुस्थान थिएटर्सचे** श्री. बाबूराव श्रोत्री व श्री. बन्याबापू गद्रे इत्यादींचा प्रामुख्यानें उल्लेख करायला पाहिजे.

सदर नाटक बंधमुक्त करतांना छोट्यापासून मोठ्या व्यक्तींच्यापर्यंत ज्या सद्‌गृहस्थांनीं सुहृद्‌भावानें मला सहाय्य केलें त्यांची सर्वांची नामसूची देणें या ठिकाणीं अवघड आहे. तरी पण विशेषतः सातारचे श्री. **भाऊसाहेब सोमण,** उपाध्यक्ष मुंबई कौन्सिल, श्री. **शंकरराव ऊर्फ तात्यासाहेब साठे** एम्. एल्. सी., श्री. **बापूसाहेब गुप्ते** पार्लमेंटरी सेक्रेटरी व माझे स्नेही श्री. **कांताचार्य रड्डी** यांचा प्रामुख्यानें उल्लेख करणें जरूर आहे व त्यांचें ऋण शिरावर अखंड ठेवण्यांत मला आनंद वाटतो.

प्रकाशनाचे बाबतींत माझे स्नेही श्री. **य. गो. जोशी.** यांचें मला नेहमींचेंच सहाय्य असतें. न सांगतांच आपुलकीनें ते या बाबतींतल्या सर्व यातायाती करीत असतात. हा ऋणानुबंध आहे येवढेंच. त्याचप्रमाणें अवघ्या चार दिवसांत हें पुस्तक तांतडीनें छापून दिल्याबद्दल **"प्रतिभा"** प्रेसचे मालक श्री. **जोशी** आणि **लोखंडे** यांचे आभार मानावेत तेवढे थोडे आहेत. शेवटीं नटवर्गांनीं आपले फोटो दिल्याबद्दल नटवर्गाचे व सुंदर फोटो काढल्याबद्दल रा. केशवराव गोडबोले बी. ए. यांचे आभार मानणें जरूर आहे.

पुणें. ता. ४।९।१९३९ **शांताराम गोपाळ गुप्ते.**

आई !—

तुझ्या पूजेस !

तुझा,
शांताराम.

" रणरागिणी "

या १९२४ सालीं सरकारनें आक्षित ठरविलेल्या

परंतु पुन्हां कॅाँग्रेस सरकारनें

बंधमुक्त केलेल्या नाटकाचा

प्रथम प्रयोग

**राष्ट्रसेवक नाटक मंडळीनें**

मुंबई सरकारचे पहिले लोकप्रिय पंतप्रधान

# ना. बाळासाहेब खेर

यांचे अध्यक्षतेखालीं

ता. ४।९।३९ रोजीं रात्रौ पुणें विजयानंद नाट्यमंदिरांत

मोठ्या थाटानें करून दाखविला.

॥ श्री ॥

# रणरागिणी

## अंक पहिला

——:०:——

### प्रवेश पहिला

[ स्थळ—शंकर किल्ला. दसऱ्याचा दिवस. सिंहद्वार शृंगारलें असून, भगवा झेंडा सिंहद्वाराच्या चौकीवर फडकत आहे. ठिकठिकाणीं सैनिक उभे असून, दूर अंतरावरून स्वारीच्या मंगलवाद्यांचा ध्वनी ऐकूं येत आहे. ]

**सुंदरः**—अजागळ धांदरट मेल्या! स्वारी दरबारांतून निघून किल्ल्याकडे निघाली सुद्धां; तरी बाईसाहेबांच्या पंचारतीची तयारी नाहीं. कामिनी अग कामिनी—

**कामिनीः**—( आंतून ) आलें ग आलें!

**सुंदरः**—आलें-आलें काय? बिनीचा हत्तीसुद्धां दिसूं लागला; तरी—

**कामिनीः**—( प्रवेशून ) तुझी आपली सदा नी कदा घाई! कामं शिस्तीनं तर झालीं पाहिजेत ना?

**सुंदरः**—ठाऊक आहे किती शिस्तीची आहेस ती! पण असं केलंस तरी काय काय? तें तर समजूं दे.

**कामिनीः**—अगं स्वारी येतांच हत्तीच्या पायांवरून कळसवणी घालायला सुवासिनी पाहिल्या. ओवाळणीच्या बायकांना बाईसाहेबांचे हुकूम कळवले. एक नी दोन—

सुंदरः--बाईसाहेबांचे हुकूम ! ओवाळणाऱ्या पाळेगारांनासुद्धां आज जातीनं आज्ञा सोडताहेत बाईसाहेब ! असं सांगितलं तरी काय ?

कामिनीः--आज ओवाळणीचा समारंभ इथंच महाद्वारांत बाईसाहेब उरकणार आहेत.

सुंदरः--बरं मग ?

कामिनीः--म्हणून स्वारीला नी बालराजांना, बाकीच्या बायकांनीं पादचारी होतांच ओवाळून घ्यावं. कारण किल्ल्यांत देवीच्या दर्शनाला स्वारी जाण्याआधीं, इथं महाद्वारांतच राणीसाहेब स्वारींना ओवाळणार आहेत. महाद्वारांत महाराज आज दुसऱ्या कुणाचीच ओवाळणी घेणार नाहींत.

लक्ष्मीः--( प्रवेशून ) असं कसं गं तुम्ही एकाचं दोन करतां ?--

( दोघीजणी मुजरे करतात. )

लक्ष्मीः--सुंदर, एलिस साहेबांनीं आज बाल आनंदरावांचा दत्तक मंजूर केला. युवराज आज प्रथमच किल्ल्यांत येणार म्हणून मी त्यांना सामोरी जायचं ठरविलं; तर बाकीच्या स्त्रियांना तो मज्जाव नव्हे.

सुंदरः--अस्सं अस्सं ! म्हणजे आज खाशी ओवाळणीसुद्धां इथंच तर ! पण महाराजांच्याकडून ओवाळणी आज झगडून घेणार कीं ते घालतील तीच घेणार.

लक्ष्मीः--स्वारींतून यायचं झालं कीं, सारी लाजबीज बाजूला सारून अगदीं स्पष्ट सांगणार कीं, स्वारींतून आणलेल्या विजयश्रीची ओवाळणी आधीं घाला नी–

सुंदरः--ओवाळणी झगडून घेणार बाईसाहेब !

लक्ष्मीः—हो हो, अगदीं झगडून घेणार.

सुंदरः—या आनंदाच्या दिवशीं छोटे युवराज जगले वांचले असते तर—

लक्ष्मीः —हं सुंदर–या आनंदाच्या दिवशीं कैलासवासी बालराजांची आठवण नको. बालराजे देवांना आवडले; त्यांना घेऊन गेले देव ! नक्षत्रमंडळांत वावरत असतील आज ! देवानं त्यांना वयानं वाढवून, आनंदरावाच्या रूपानं आमच्या ओट्यांत घातलं; यांतच आम्हांला

आनंद आहे. जा; डंका नौबदी जवळ वाजूं लागल्या. कामिनी, पंचारती अगदीं तयार ठेव. हो, सुंदर बालयुवराजांनीं सिंहद्वारांत पाऊल टाकतांच घनगर्जनेची पहिली सलामी बालराजांना होऊं द्या; म्हणून गोलंदाजाला इषारा देऊन ठेव. नी बालराजांची दृष्ट तूं काढ ! आज जिवाला आनंदाचं कसं नुसतं भरतं आलं आहे. आनंद–आनंद–अगदीं आनंदी आनंद आहे आज. ( आंत जयवाद्यें " राजराजेश्वर गंगाधर महाराज कीं जय " असा जयघोष ) अगबाई स्वारी हत्तीवरून उतरली सुद्धां ! सुंदर, अग कामिनी......( धाईनें जाते. )

[ कलश घेतलेल्या पांच सुवासिनी व मागून पंचारती घेतलेल्या कांहीं दासी, सिंहद्वारांतून स्वारीच्या हत्तीकडे उजव्या बाजूकडे जातात. ]

**मोरोपंतः**––( प्रवेशून ) " राजराजेश्वर बुंदेलाधिपती गंगाधर महाराजकी जय ! "

( सर्वत्र जयजयकार होतो. गंगाधरराव सोबत आनंदराव मागून एलिस वगैरे. स्त्रिया हत्तीकडे कलश ओततात. )

**गंगाधरः**––मामासाहेब, आपल्याच माणसानं आपलाच जयजयकार करणं, म्हणजे स्वतःभोंवतीं दिवे ओवाळण्यासारखं नाहीं ? आज खरा जयजयकार जर कुणाचा व्हायला पाहिजे असेल, तर युवराजांचा ! झांशीच्या भावी कल्याणाची काळजी आज दूर झाली. साहेबांचे झांशीवर फार उपकार झाले.

**एलिसः**––Oh no no—I did but my duty !
आमचा टे काम होटा !

**गंगाधरः**––युवराज, ओवाळणारांना आज मोहरांची ओवाळणी घालायची बरं कां ! आज पहिली ओवाळणी तुमची.

[ नगरस्त्रिया ओवाळतात. आनंदराव ओवाळणी घालीत सिंहद्वाराकडे जातो. ]

**आनंदः**––बाबासाहेब त्या पहा–त्या पहा आईसाहेब ! आई आई ( धांवत जातो. )

**लक्ष्मीः**––हं बालराजे, मन आतां आवरायला शिकलं पाहिजे तुम्हांला. सुंदर, बालराजांची दृष्ट काढून, ओवाळ त्यांना––

मुंदरः—बालराजांना आज खरंच दृष्ट झाली असेल.

[ मुंदर दृष्ट काढून जाते. कामिनी ओवाळते. ]

कामिनीः—( तीट लावून ) पण बाईसाहेब खाशा स्वाऱ्या तशाच तिष्ठत......

गंगाधरः—म्हणजे ? आमची दृष्ट काढणार आहे कीं काय कुणी ?

लक्ष्मीः—इश्श ! दसऱ्याची ओवाळणी म्हणजे दृष्ट काढणं वाटतं ?

गंगाधरः—तेंही खरंच ! दृष्ट लागण्यासारखं आमच्याजवळ राहिलं आहेच काय ! बालराजांची दृष्ट काढली तें बरोबर. कारण उद्याच्या झांशीच्या साऱ्या आशा, या बालरूपांत लपलेल्या आहेत. पण आमची ओवाळणी ? ओवाळणी तरी कशाबद्दल नी कशाची घालणार ?

लक्ष्मीः—कशाची म्हणजे ? दसऱ्याच्या मुहूर्तावर स्वारीवर निघण्याचा मराठ्यांचा कुलाचार आपण पाळतां. मग ओवाळणीचा कुलाचारचं तेव्हढा कां नाहीं पाळायचा ? मराठ्यांच्या स्वारींतली विजयमाला, घर-धनणीच्यांच मालकीची असते !

गंगाधरः—स्वारींत मिळवलेली विजयमाला ! विजयादशमीच्या मुहूर्तानं बाहेर पडून विजयश्रीला खेचून आणण्याचें कामीं आम्ही आर्यावर्तातले लोक आतां अगदीं नादान ठरलो आहोत. शिवाय या मूर्तिमंत लक्ष्मीला आज मी कोणत्या लक्ष्मीची ओवाळणी घालणार ?

लक्ष्मीः—कोणत्या म्हणजे ? आपल्याजवळ विजयश्री नसेल, तर आपल्याला अतिशय प्रिय असणारी कोणतीही वस्तु या लक्ष्मीला द्या. स्त्रीजात अल्पसंतोषी असते.

गंगाधरः—लक्ष्मी, या गंगाधररावाजवळ विजयश्री इतकीच किंबहुना अधिक प्रिय असणारी वस्तु, म्हणजे आपल्या पूर्वजांनीं ज्या रणसम्राज्ञीच्या जोरावर विजयश्री खेचून आणली ती ही इंग्रजांच्या कृपेनें माझ्या हातीं राहिलेली माझी आवडती समशेर ! या विजयादशमीच्या मुहूर्तानं रणरागिणीच्या या आवडत्या लक्ष्मीनं जर मी या लक्ष्मीचा सन्मान केला तर चालेल ना ?

लक्ष्मीः—या ओवाळणीपेक्षां अधिक मोलाची अशी कोणती ओवाळणी असणार ?

( लक्ष्मी गंगाधररावास ओवाळते. गंगाधरराव ओवाळणी म्हणून समशेर घालतात. )

**मोरोपंतः**—कैलासनाथा, हा आनंदाचा सोहाळा, माझ्या लाडक्या मनूला आजन्म लाभूं दे.

**लक्ष्मीः**—( ओवाळूं लागते ) देवा, पतीच्या प्रीतिबरोबर अखंड सौभाग्य लाभूं द्या.

( इतक्यांत तलवारीच्या वजनानें पंचारती पडून विझते व हातीं समशेर मात्र रहाते. )

**सर्वः**—अरेरे हें काय ?

**गंगाधरः**—काय झालें हें ! लक्ष्मी, अपशकून ?

**लक्ष्मीः**—देवा, देवा. लक्ष्मीच्या हृदयाला धीर द्या. तिला सावरून धरा.

**गंगाधरः**–लक्ष्मी झांशीच्या अभिमानी समशेरीचें आज लेणं ल्यालीस! पण हा अपशकून...

**लक्ष्मीः**—नाहीं अपशकून नाहीं हा ! या विजयादशमीला आपल्या हातीं, समशेरीची ओवाळणी घेतानांच, या लक्ष्मीच्या प्राणज्योती, माझ्या निरंजनाच्या ज्योतीच्या रूपानं, मातृभूमींत लीन होतांना दिसल्या. हातीं पूर्वजांची समशेर मात्र राहिली. समशेरीच्या तीर्थावर लक्ष्मीची प्राणज्योत मालवणार असा गोड संदेश तर नाहीं हा ?

**गंगाधरः**—किती गोड कल्पना ! लाडके लक्ष्मी, कमकुवत हृदयांनीं निर्माण केलेल्या या अपशकुनांच्या कल्पना, प्रत्येक हृदयांतून जर अशाच नष्ट होतील तर काय बहार होईल ? मामासाहेब, तुमची मनू आजपासून झांशीची खरी मालकीण झाली. साहेब आमच्या हातची समशेर, आज राणीसाहेबांनीं आपल्या हातीं घेऊन, राज्याच्या जबाबदारींतून आम्हांला त्यांनीं मुक्त केलं आहे. ध्यानांत असूं द्या. प्रजाजनहो आजचा मंगल दिवस लक्षांत ठेवा. झांशीचा इतिहास राणी लक्ष्मीच्या हातीं रंगणार, असा संकेत दिसतो. झांशीचं नांव महाराणीच राखील. राणीसाहेब, या झांशीचं वैभव, पूर्वजांचं नांव, स्वतःचा धर्म, स्वतःचें हक्कपालन करण्याकरतां, जगांतील

कोणत्याही असुरी सत्तेशीं झगडायला तूं मागं पुढं पाहूं नको. या पुढं तुझी पाठीराखी–ही तुझी बहीण समशेर ! ( जाऊं लागतो. )

लक्ष्मीः––बाबासाहेब, प्रजाजनहो, पतिदेवांची इच्छा ऐकलीत ? या विजयादशमीच्या मंगल मुहूर्तावर मीही जाहीर करतें कीं, प्रसंग पडेल तर देहीं खेळणाऱ्या जिवंत कुंकवाच्या टिळ्यानं, या रणदेवीचं कपाळ मी साजरं करीन. पण झांशीचं नांव मळीन होऊं देणार नाहीं. याला साक्षी माझं सौभाग्य ! या झांशीची वैभवदेवता !

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळ––झांशी. सुंदरलालचें घर. सुंदरलाल प्रवेश करतो. ]

सुंदरः––कालमहिमा कांहीं और आहे यांत शंका नाहीं. साता-समुद्रापलीकडचे हे टोपीवाले, पण यांना सुद्धां आमच्यांत मिसळणं आवडतं ! साहेब हिंदी बोलतो, तर हिंदी साहेब बनूं लागतो. बाबा-साहेबांच्या देवघरांत या सुंदरलालचा जन्म नुसता देवपूजेंत, घंटा बड-विण्यांत जातो कीं काय–असं वाटत होतं; पण हे टोपीवाले या झांशीच्या दरबारांत आल्यापासून, बाबासाहेबांच्या ब्राह्मण्याला थोडा आळा पडूं लागला आहे. ही मनोरम साहेबी वागणूक डोळ्यांपुढं गुलजार पतंगा-प्रमाणं नाचूं लागल्यापासून, माझी स्थिति एकाद्या छबकड्या छोकरी-प्रमाणं झाली आहे ! साहेबाप्रमाणं नटावं, साहेबाच्या तिच्याप्रमाणं आमच्याही तिला, एकदां परकर नेसायला द्यावा, असं वाटतं ! पण लोक हंसतील म्हणून मन कचरतं. वाड्यांत आमच्या तिला मिळणारे कांहीं सुंदर जिन्नस, एका साहेबाला देऊन मी त्याच्याशीं दोस्ती करून घेतली आणि तिच्या नकळत तिचा कंठा त्याला देऊन, त्याच्याकडून ही एक औषधाची कुपी आणली. पण या औषधीचे गूण काय, हेंच विचा-रायला विसरलों. आमच्या तिच्यासमोर आतां जबानी द्यायची वेळ आली तर काय सांगूं ?––दमा–खोकला–सर्दीवारक–( विचार करीत उभा राहतो. )

सुंदरः––( कंठा शोधीत प्रवेशते ) आतां शोधूं तरी कुठं ? अगबाई, हे इथं काय करताहेत ? नी ते हातांत काय ? कुपी ? स्वारीनं कंठा घालवून ही कुपी आणली वाटतं! (उघड) अहो, माझा कंठा कुठे आहे ?

सुंदरः––वातहारक ! कंठा ? अरे बापरे ! ज्या दत्ताला भीत होतों तेंच पुढं ! चोरीचं बेंड इतक्यांत फुटलं ?

सुंदरः––काय हो–कां–बोलत कां नाहीं ?

सुंदरः––काय बोलूं ?

सुंदरः––माझा कंठा कुठें नेलांत तो आणून द्या. कंठा तुम्हीच नेलात.

सुंदरः––हें खरें ना ? मग आतां कितीही कंठशोष केलास तरी कंठा तुला मिळणं शक्य नाहीं ! तो गेला साहेबाकडं––

सुंदरः––म्हणजे माझा कंठा तुम्ही साहेबाला दिलात तर ?

सुंदरः––अरेच्या ! बोलण्याच्या भरांत मी हें सुद्धां कसं भकलों बुवा ! आश्चर्य आहे.

सुंदरः––चला निघा घराबाहेर. माझा कंठा मला आत्ताचे आत्तां पाहिजे ! मागं एकदां असंच कांहींसं दिलंत. आज कंठा दिलात ! आतां उद्यां मलाच देऊन टाका म्हणजे झालं !

सुंदरः––कंठा साहेबाला दिला; म्हणून तुला देईन कीं काय ? तुला देण्याइतका मी खुळा नाहीं.

सुंदरः––ही बटबट पुरे करा नी कंठा आणून द्या ! पण अशानं नाहीं तुम्ही ताळ्यावर येणार ! एकदां झालं, दोनदां झालं. आतां अश्शीच्या अश्शी बाईसाहेबांकडे जाते नी––

सुंदरः––अरे देवा ! ती कडक बिजली ! अग ए. असं काय करतेस ! मी चुकलों. तोंडांत मारून घेतों–पण रागावूं नकोस. तूं कधीं चुकलीस तर तुला पण मी रागावणार नाहीं ! ठरव तह. या टोपीवाल्यांचे कांहीं गूण घे. या वेळीं तुझ्या ठिकाणीं एकादी साहेबीण असती, तर नवऱ्यानं क्षमा मागतांच, लडिवाळपणानं त्याच्या गळयांत पडली असती ! सुंदरी, क्षमा कर. अग खरं सुख काळ्यागोऱ्यांच्या एकींत आहे.

सुंदरः––आज तुमचं डोकं तर नाहींना फिरलं ?

सुंदरः—यांत तुला राग तो कशाचा आला? अग प्रत्येक ठिकाणीं काळ्यागोऱ्यांचा संगम झालाच पाहिजे, असा विधिसंकेत आहे! चांदणीची चमचम खुलवायला काळ्या अंधाराची साथ असली पाहिजे! सीता मूर्तिमंत सौंदर्य, तर राम घनश्याम. आपल्या मादक दर्पानं मनाला मोहिनी घालणाऱ्या सुंदर केतकीभोंवती, काळा भुंगा गुंगायचाच! या हिंदुस्थानचीच गोष्ट घे. काळ्यागोऱ्यांच्या एकीला बाध येऊं नये म्हणून हे गोरे काय काळ्या हिंदूना भेटायला आले? फार कशाला, आपणाकडे एकदाच पहाणाराला सुद्धां, आपण एकमेकांच्या नांवाची चोरी करून काळ्यागोऱ्यांची मैत्री यापूर्वीच सिद्ध केली आहे, असं वाटेल. सुंदर नांवानं सुचविला जाणारा उंदराचा काळेपणा, या सुंदरच्या वाट्याला, तर माझ्या नांवांत सांठविलेल्या साऱ्या सौंदर्याची मालकीण ही सुंदर!

सुंदरः—घरादाराचं वाटोळं करायचा बेत आणलात, तरी चारगटपणानं बडबडायला लाज नाहीं वाटत!

सुंदरः—लाज! अग लाज धरली त्याचं काज बिघडलंच! नूतन विवाहित जोडप्यातल्या फाजील लाजेला, ज्यावेळीं फाटा मिळतो, त्याच वेळीं त्यांच्या जिभेला फाटा फुटून प्रेमांत गोडी लागते! लाज ही एकीचा नाश करणारी आहे. पहा अलिकडं तुझी लाज फाजील नाहींशी झाल्यानं तुझ्या जिभेला सुद्धां कसा फाटा फुटला आहे अलिकडं!

सुंदरः—पण तुमच्या तर अकलेला सुद्धां फाटा फुटला आहे. पुरुषांच्या अकलेला फाटा फुटला, म्हणजे बायकांच्या जिभेला सुद्धां फाटा फुटूं नये कीं काय? नवऱ्याचे वाढलेले कान कापून बरोबर करण्याचा स्त्रियांना जन्मसिद्ध नसला तरी लग्नसिद्ध हक्कच असतो! समजलांत?

सुंदरः—हां खबरदार! धुळाक्षरं शिकवितांना माझ्या पंतोजींनीं सुद्धां माझे कान कधीं पकडले नाहींत. कजाग—हिडिंबा—

सुंदरः—मी कजाग—हिडिंबा काय? बाबासाहेबांचे कोरडे पाठीवर उडाले म्हणजे समजेल. ( जाऊं लागते. )

सुंदरः—आता काय तुझ्यापुढें नमस्कार घालूं? खरंच कुणाचा होऊं नये चाकर नी कुणाचा होऊं नये नवरा. ( नमस्कार घालतो. इतक्यांत कामिनी येते. )

**कामिनीः**––कोण सुंदरलाल ? अहो हें काय ?

**सुंदरः**––( पडल्या जागेवरून ) अरे देवा ! कोण कामिनी ? काय ही फजिती ! जमीन दुभंगून एकदम गडप कां झाली नाहीं ?

**कामिनीः**––हें हो काय सुंदरलाल ? नमस्कार नी तोही बायकोला !

**सुंदरः** –शेवटीं या नमस्कारानं दगा दिला. अग बये, तुला तरी आत्तांच कसं यायला फावलं ? नी आलीस ती आलीस पण आंधळी होऊन कां नाहीं आलीस ?

**कामिनीः**––कां हो, बोलत कां नाहीं ?

**सुंदरः**––त्यांची वाचा बसली आहे.

**सुंदरः**–हो कामिनी, हिच्या प्रेमाचा तोठरा माझ्या घशांत अडकल्या-मुळें मला बोलतां येत नाहीं !

**कामिनीः**––सुंदर, इतका तोंडाळपणा नवऱ्याशी चांगला नाहीं हो ! पाप लागतं ना अशानं ! इतक्या दिवस मी ऐकतच होतें कीं सुंदरलाल म्हणजे भोळे शंकर आहेत. पण आज अगदीं खात्रीच झाली ( स्वगत ) खरंच माझं प्रेम आहे तें अगदीं योग्य जागींच बसलंय हो. आतां तर निश्चयच झाला ! लग्न करीन तर या लालाशींच ( उघड ) सुंदर असला लाल तुला मिळाला, हें तुझं नशीब समज.

**सुंदरः**––असल्या लालापेक्षां एखादी कांच पुरवली ! खरंच माझं नशीब तुझ्या वाट्याला जाईल तर मी नशीबवान होईन.

**कामिनीः**––नशीबाची अदलाबदल करायला मी या क्षणीं तयार आहे. पण तूंच––

**सुंदरः**––अस्सं, लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं तुझं.

**सुंदरः**––अरे बापरे ! एका मुलूख मैदानशीं तोंड देतां देतां जर इतका घामाघूम होऊन जातों, तर आणखी दुसरी महांकाली कशाला ? गारद करायला मला ?

**कामिनीः**––बाई ग बाई ( बाजूंस ) काय ही यांची केविलवाणी दशा ! जीव कसा माशासारखा तळमळतोय ! ( उघड ) बाईसाहेबांच्या पुढची ही अल्लाची गाय, सख्या नवऱ्याशीं मात्र इतकी लाथाळ आहे तर !

सुंदरः---त्याला कारण यांचे गुण--

सुंदरः---नी हिचं प्रेम.

कामिनीः---यांचे गुण ? असं काय ग त्यांनीं केलं ?

सुंदरः---अग कांहीं नाहीं. तिचा एक भिकार कंठा देऊन हें औषध आणलं. पहा पाहिजे तर......

सुंदरः---( कुपी हिसकावून घेते ) औषध-औषध एव्हढं कसलं हो हें बहुगुणी औषध आहे ?

सुंदरः---दमा-खोकला सर्दी वारक-वातहारक-पित्तनाशक-तापमारक पौष्टिक असं हें बहुगुणी औषध आहे,

सुंदरः---( वास घेऊन ) अगबाई ही तर दारू !

कामिनीः---काय दारू ?

सुंदरः---काय दारू ? अररं ! असा कसा घसरलों बुवा ! बेट्यानं घात केलान्. या कानापासून या कानापर्यंत साफ गळा कापला कीं !

सुंदरः---सांग. आतां रागावूं नको तर काय यांचे पाय धरूं ? कां हीच कुपी यांच्या नरड्यांत ओतूं ?

सुंदरः---शांतं पापम् ! शांतं पापम् ! पण मी तरी आतां काय करूं ? कां हीच कुपी त्या देणाऱ्याच्या टाळक्यांत घालूं ? फसलों झालं ! एकदां सोडून दहादा तुझे पाय धरतो.

कामिनीः---( स्वगत ) अहाहा ! जीव ओवाळून टाकावासा वाटतो. ( उघड ) नका सुंदरलाल तुम्ही नका तिचे पाय धरूं. मीच तुमचेकरतां तिचे पाय धरते हो ! सुंदर, तुला कंठाच पाहिजेना ?

सुंदरः---हो मला कंठाच पाहिजे. देतेस तूं ?

कामिनीः---हो हो, मी देते ! पण या लालांना एक शब्द बोलणार नाहीं असं वचन दे.

सुंदरः---तसं वचन द्यायच्या आधीं, घरांतली कोणतीही वस्तु यापुढें बाहेर देणार नाहीं, अशी यांनीं शपथ घेतली पाहिजे ! मग देते मी वचन.

कामिनीः---सुंदरलाल माझ्याकरतां घ्या ही शपथ !

सुंदरः---आजपासून तुझ्याकरतां काय वाटेल तें करीन. मग शपथेची काय गोष्ट आहे ! देवाशपथ यापुढें मी घरांतले कांहीं एक नेणार नाहीं.

कामिनीः--हं आतां मीं मागितलेलें वचन ?

सुंदरः--हे घे ! नवऱ्याला का कुणी टाकून बोलतं ? पण तूं कंठा कुठला देणार ?

कामिनीः—अग आनंदरावांना दत्तक मंजूर केला, म्हणून बाई-साहेब वाड्यांत पोळकरणींना कंठे देताहेत. मी तुला बोलवायलाच आलें होतें. तर इथं हा प्रकार ! माझा कंठा मी तुला देईन. पण यांना आतां छळूं नकोस.

सुंदरः—त्यांची नको आतां तुला काळजी !

सुंदरः—खरंच कामिनी, तुझ्या आजच्या उपकारानं पुनर्जन्म झाला माझा ! तुझे उपकार मी जन्मांत विसरणार नाहीं. ( बाजूस ) हें असं काय व्हायला झालं मला ? हिच्यावर मी प्रेम करायला लागलों कीं काय ?

कामिनीः--( बाजूस ) त्यांचंहि प्रेम आहे बरं कां माझ्यावर ! आई म्हणते कीं पोरी " तुझं बाशिंगबळच जड " " बाशिंगबळच जड " पण पहाते आतां माझं लग्न कसं होत नाहीं तें !

सुंदरः—कामिनी, कधींमधीं येऊन भेटत जा. बरं वाटेल जरा.

सुंदरः—कांहो परक्या बायकांशीं असंच वागायचं शिकविलं आहे वाटतं शास्त्रांनीं ?

कामिनीः--सुंदर, पण मी कुणी परकी का आहे आतां ?

सुंदरः--शिवाय हिला आज पाहिल्यापासून मला आपला भारीच आपलेपणा वाटायला लागला आहे हिच्याबद्दल. त्याला मी तरी काय करूं ?

सुंदरः--नशीब माझं. कामिनी चांगलं केलंस बाई! सवत पण सवत.

कामिनीः--इश्श हें ग काय ? चल मुकाट्यानं वाड्यांत.

सुंदरः—नाहींतर प्रेम चव्हाट्यावर येईल ना ? ( जातात ).

सुंदरः—प्रेम ही चीज आज आम्हाला समजली. या कामिनीचं माझ्यावर प्रेम आहे बरं का ? नी माझं तिच्यावर. अरे वा ! पण आमचं कुटुंब ! ( जातो ).

---

## प्रवेश तिसरा

(स्थळ–ब्रह्मावर्ताजवळचें अरण्य. रावसाहेब व एक वाघीण यांची झुंज चालू आहे. रावसाहेब सुटण्याचा प्रयत्न करीत आहेत.)

**रावसाहेबः**—सोड, वनराज्ञी सोड मला. तुझी अचाट शक्ति रावसाहेबाशीं झुंझायला असमर्थ आहे. विनाकारण कां हा झगडा? काय नाहीं सोडित–नाहीं सोडीत?

**मोरोपंतः**—(आंतून) अरेरे रावसाहेब हें काय?

(गोळीचा आवाज होतो. वाघीण मरते. मोरोपंत प्रवेश करतात)

**मोरोपंतः**—रावसाहेब खैर केली दैवानं! आपण जखमी केलेल्या वाघाच्या पाठीमागें मी धांवत गेलों तो इकडं हा प्रसंग!

**रावसाहेबः**—वाघाला जखम झालेली पहातांच ही वाघीण माझ्यावर चवताळून आली! दैवयोगानं माझी गोळी चुकली आणि हिची नी माझी झटापट सुरूं झाली. इतक्यांत आपण आलांत. पण तो जखमी झालेला वाघ कुठं आहे?

**मोरोपंतः**—माझ्या हांतून तो निसटला! पण पुढं त्याचा पाठलाग याच रानांत शिकारीला आलेल्या मेजर हेस्टी साहेबानं सुरूं केला.

**रावसाहेबः**—काय? आपली शिकार तुम्ही त्यांच्या स्वाधीन केलीत? तुमच्या मनगटांत त्या वाघाला लोळविण्याची शक्ति असतांना, तुम्ही केविलवाण्या तोंडानं मागं परतलांत?

**मोरोपंतः**—श्रीमंत, मी मागं परतलों याचं कारण...

**रावसाहेबः**—काय याचं कारण?

**मोरोपंतः**—याचं कारण या शिकारीपासून मेजर साहेबांना होणारें समाधान...

**रावसाहेबः**—अरेरे! एकाद्याच्या समाधानाची जी किंमत, ती सुद्धां दुसऱ्याच्या स्वाभिमानाची नसावी ना? मोरोपंत, तुमचा अभिमान गेला कुठें? कुबेरनगरीं झांशीचें दिवाण मोरोपंत तांबे. महामानी लक्ष्मीचे जनक मोरोपंत तांबे. आज इतके निर्वीर्य कसे बनले? मोरोपंत हांतून सुटलेल्या या एका वाघाची किंमत नाहीं. असले पन्नास वन सम्राट

नुसत्या हातानं लोळविण्याचं सामर्थ्य या रावसाहेबांत आहे. पण मोरोपंत हा वाघ म्हणजे तुमचा अभिमान होता! हा वाघ म्हणजे हिंदूंच्या स्वाभिमानाची निशाणी होती.

**मोरोपंतः**––रावसाहेब, कोणताही हिंदू आपला स्वाभिमान कधींच जखमी होऊं देणार नाहीं.

**रावसाहेबः**––मग कोणत्या भावनेनं तुम्ही आपली शिकार सोडलीत त्यांच्यापेक्षा तुम्ही कमी योग्यतेचं–

**मोरोपंतः**––मुळींच नाहीं! एका पाश्चिमात्याचा जो मान, तोच हिंदूचा मान, एका टोपीवाल्याची जी माणुसकी, तीच आमची माणुसकी ही भावना या मोरोपंताच्या हृदयांत पूर्णत्वानं जागी होती! रावसाहेब, मी ही शिकार आनंदानं आणि अभिमानानं आपल्या चक्रवर्ती सत्तेला अर्पण केली.

**रावसाहेबः**––अरेरे! मोरोपंत काय बोलतां हैं? अभिमानानं अर्पण केली? आनंदानं अर्पण केली? मोरोपंत, या तुमच्या शब्दांत किती जहरीपणा आहे, याची कल्पना तरी आहे का तुम्हाला? गुलामगिरींत मान आहे कां? दास्यत्वांत अभिमान रहातो कां? आपणहून दुसऱ्याची गुलामगिरी कबूल करण्यांत तुमच्या झांशीच्या सरदारकीला भूषण वाटतं काय?

**मोरोपंतः**––पण राजनिष्ठा म्हणजे गुलामगिरी नव्हे. राजनिष्ठेनें स्वतःचा अभिमान नष्ट होत नाहीं. रावसाहेब, साऱ्या आर्यावर्तानं इंग्रजांच प्रभुत्व कबूल केलें आहे. जितक्या एकनिष्ठपणानें मराठी सत्तेपुढं, शिवाजी महाराजांच्या भगव्या झेंड्यापुढें हिंदूंनीं आपल्या माना वांकविल्या; तितक्याच एकनिष्ठपणानं आपल्या चक्रवर्ती सत्तेपुढं आपल्या माना नकोत का वांकवायाला? रावसाहेब, राजनिष्ठा पवित्र राजनिष्ठा हें आम्हां हिंदूंच ब्रीद आहे, हें आम्हां हिंदूंच शील आहे.

**रावसाहेबः**––राजनिष्ठा! बदलत्या परिस्थितीबरोबर शब्दांचेही अर्थ बदलत असतात का? मोरोपंत, स्वतःच राजे असतांना तुम्ही राजनिष्ठा कुणाकरतां दाखविणार? ज्या पेशव्यांच्यामुळं झांशीचं नांव झालं, ते तुमचे खरे धनी पेशवे आज रानोमाळ भटकत आहेत, नी तुमच्या राजनिष्ठेच्या वल्गना!

मोरोपंतः––रावसाहेब, परिस्थितीला नी दुसऱ्याला दोष द्यायच्या ऐवजीं, स्वतःच्या दुबळ्या कर्तबगारीला कां नांवं ठेवीत नाहीं ? दुबळ्या धन्याच्या पायींचे पाईक होण्यांत जतिवंत राजनिष्ठेला कधींच धन्यता वाटत नाहीं. पुण्याचा शेवटचा पेशवा, दुबळ्या बाजीरावाऐवजीं खरा गाझी असता, तर झांशीची राजनिष्ठा अशी व्यभिचारी दिसतीच ना ! ( पडद्यांत वाघ गुरगुरतो. )

रावसाहेबः––मोरोपंत, ऐका साहेबाच्या हातून शिकार सुटली ! व्हा पुढं नी आपली शिकार पुन्हां रोखून धरा.

मोरोपंतः––नाहीं. ते पहा. ते साहेब त्याचा पाठलाग करीत आहेत. दुसऱ्याच्या शिकारीवर गोळी चालवणं खऱ्या शिकाऱ्याचं ब्रीद नाहीं. मी होऊन ही शिकार साहेबांना दिली आहे.

रावसाहेबः––( हंसतो ) तुमच्या हातची शिकार साहेबाच्या मालकीची होते; तर तीच शिकार माझी कां न व्हावी ? ( वाघ गुरगुरतो. रावसाहेब गोळी झाडतो. वाघ मरतो. ) ही शिकार माझी झाली !

हेस्टीः––( प्रवेशून ) गोली कोनी झारली ?

रावसाहेबः––मी–या रावसाहेबानं.

हेस्टीः––कोन–कोन रावशाप ?

रावसाहेबः––नानासाहेब पेशव्यांचा भाऊ.

हेस्टीः––आन–टूमी ?

मोरोपंतः––झांशीचे सरदार मोरोपंत तांबे.

हेस्टीः––Moropant Tambe ! राजनिष्ठ गंगादररावचा फादर इन् लॉ ! Good morning Raosaheb ये शिकार तुमाला डेला परत !

रावसाहेबः––माझी शिकार साहेबांना न्यायची असेल, तर खुशाल न्यावी.

हेस्टीः––No–no–no ये आमचा शिकार ! पिस्टल, फायर आर्म, बिगर परवाना वापरणं ये गूना है ! पन हे गूना टूमाला माप.

रावसाहेबः––पिस्तुल बंदूका हिंदूंना आज दिसताहेत साहेब ! हिंदूंचा पराक्रम पिस्तुलबंदुकांशिवायच आजपर्यंत इतिहासांत रंगून गेला

रावसाहेबः--रामचंद्रराव पुन्हां घेरलं आपल्याला ? देवीच्या शेवटच्या इच्छेप्रमाणं तिचा पार्थीव देहाची विटंबना आधीं टाळली पाहिजे. बाळ आनंदाचं रक्षण केलं पाहिजे.

रामचंद्रः—ती पहा मोठी गंज दिसते तिथं श्रीमंत—

रावसाहेबः—तीच आतां देवीची चंदनाची चिता–घाई करूं या.

( उचलून नेतात इतक्यांत सर ह्यू रोज, हेस्टी येतात. )

हेस्टीः--किधर गया ! They were here-oh! ( पडदा उघडतो, लक्ष्मीची चिता भडकलेली दिसते. रावसाहेब वगैरे गुडघे टेकून वसले आहेत.)

हेस्टीः--कौन रावशाब ! Arrest ! और ये क्या ?

रावसाहेबः--( पकडल्यावर ) ये क्या ! झांशीची राणी–हिंदुस्थानची रणरागिणी !

सर ह्यू रोजः--ओह्! महारानी लछीमीबाई ?–"Joan of Ark of India." I honour Thee Brave!-Flag, Honour ( हॅट काढून गुडघे टेकतों. युनियन जॅक अर्धवट खालीं होतें.)

हेस्टीः--Hail Britania !

रावसाहेबः—' वंदे मातरम् '

( रावसाहेबाला कैद करतात. पडदा पडतो.)



पान ३५, प्रवेशाचे शेवटीं—

एलिसः—नाइलाज–नाइलाज–नंतर

Ah ! Malcom, Malcom, see the actual effect of your policy ! You brought the Peshwa's rule to an end and in the same way, you played an important part in the annexation of Zansi ! Powerful Britania, if Thou wilt not change thy present policy, be sure that it will ruin thy cause !

---



हेस्टी :—गोली कूनी झारली ?  [ पान १४

आहे. हिंदूंचा पराक्रम भाल्यासमशेरीवरच रंगला तो अंतर्यामीच्या बळावर ! या पिस्तुलावर नाहीं साहेब.

हेस्टीः—या वागन्यानं टूमा लोकांना हत्यार वापरनं गुना ठरलं !

रावसाहेबः—हत्याराचा प्रतिकार हत्यारानंच झाला पाहिजे; ही दुनियेची पाशवी रीत, हिंदूंच्या राजस मनोवृत्तींनां पटणारी नाहीं. निःशस्त्राचं राजकारणही, हत्याराची धार कधीं काळीं बोथट केल्याशिवाय रहाणार नाहीं.

मोरोपंतः—रावसाहेब, शब्दानं शब्द वाढविणार कीं, शिकार यांचे स्वाधीन करणार ? नी एका पराक्रमी तेजस्वी जातीची मैत्री संपादणार ?

रावसाहेबः—मानवी जातीनं एकमेकांचं वैर करणं, कोणत्याही सरळ हृदयाला पटणार नाहीं.

मोरोपंतः—मग शिकारीसारख्या क्षुल्लक गोष्टीकरतां हा वाद कां ? माझ्याकरितां–रावसाहेब अजातशत्रुत्वाकरतां ही शिकार यांना द्या.

रावसाहेबः—साहेब, येव्हढ्यानंच जर आपलं समाधान होत असेल तर ही घ्या शिकार. ( साहेबाचे लोक शिकार नेतात. )

हेस्टीः—अच्छा आमचा डौरा झांशीला येल, तवा गांठ परल. अच्छा Good day. ( जातो. )

रावसाहेबः—मोरोपंत—

मोरोपंतः—रावसाहेब—

रावसाहेबः—प्रसंग क्षुल्लक पण परिस्थितीवर किती झगझगीत प्रकाश पडला त्यानं ! मनुष्याला स्वाभिमान नुसता व्यक्त करायलासुद्धां परिस्थिती मोकळीक देत नाहीं कां ? दुर्दैवी पेशव्यांच्या कुळानं आतां नांव तरी कां सांगावं ?

मोरोपंतः—सार्वभौम सत्तेशीं मित्रत्व ठेवूनच ते तुम्हांला सांगतां येईल. रावसाहेब स्पष्ट बोललों माफ करा. पण शांतपणानं आल्या परिस्थितीला मान तुकविण्यांतच मोठ्यांचा मोठेपणा असतो, याचा विचार करा. येवढीच पेशव्यांच्या या जुन्या चाकराची विनंती आहे. ( नमस्कार करतो. )

———

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[ स्थळः---ब्रम्हावर्त, गंगातटाक नानासाहेब पेशवे सायंसंध्येस बसले आहेत. जवळ अधोमुख मोरोपंत उभे आहेत.]

**मोरोपंतः**—( मावळत्या सूर्याकडे पाहून ) श्रीमंत नानासाहेब, या मावळत्या सूर्याकडं दृष्टी गेली कीं, झांशीचा सूर्यास्त डोळ्यापुढं स्पष्ट उभा राहतो ! श्रीमंत गंगाधररावांना कैलासवासी होऊन आज उणींपुरीं तीन वर्षं झालीं; पण अद्याप ती गोष्ट कालच झाल्याइतकी ताजी वाटते !

**नानासाहेबः**—मोरोपंत, परमेश्वरी इच्छेपुढं पातशाही इच्छेचा मुळींच पाड नसतो. विचारी मनानं गेल्याचा शोक न करतां सद्य परिस्थितीकडेच नजर दिली पाहिजे ! पाहिलंत या सूर्याकडं ? खरोखरच या प्रशांत रक्त-बिंबाकडं दृष्टी गेली कीं, हृदयांत कसलेही भडकणारे विचार असले तरी तरी त्या सर्वांना या सायंकाळच्या अर्घ्याबरोबरच, या गंगाजलांत सोडून द्यावं असंच वाटतं. मानवी मनोवृत्तींना क्षुब्ध करणाऱ्या गोष्टी ज्याप्रमाणें या जगांत प्रत्यहीं घडत असतात, त्याचप्रमाणें त्या क्षुब्ध मनोतरंगांना शांततेचं स्वरूप आणून देण्याचींही साधनं जगांत अस्तित्वांत आहेत ! मला तर वाटतं कीं, रात्रींच्या वेळीं भयाण राक्षसी रूप धारण करणाऱ्या धरित्रीला प्रसन्नता आणण्याकरितां, प्रभात काल आणि माध्यान्हीच्या प्रखरतेला प्रशांत रूप देण्याकरतां सायंकाल या दोन कालांची योजना, या दुनियेच्या व्यवहारांत परमेश्वरानं याच हेतूनं केली असावी ! हल्लीं या हिंदुस्तानांत बंडाच्या पेटलेल्या वणव्याकडं दृष्टी गेली नी स्वधर्माकरतां स्वाभिशीं या इंग्रजांशीं झुंझायला तयार झालेल्या या हिंदूमुसलमानांचा विचार करूं लागलं कीं, एकवेळ चित्तवृत्तींत चलबिचल होऊन हातीं आपणही शस्त्र घ्यावं—

**रावसाहेबः**---( प्रवेशून ) होय नानासाहेब, शस्त्र—आतां पेशव्यांनीं हातीं शस्त्रच घेतलं पाहिजे.

**मोरोपंतः**—श्रीमंत, मी ज्या कामाकरतां झांशीहून इथं आलों, तें काम करायची वेळ आली. या बंडांत झांशी राजनिष्ठच रहाणार.

**रावसाहेबः**—नानासाहेब, माझ्या म्हणण्याप्रमाणें वागायला आपली तयारी आहे किंवा नाहीं ?

**नानासाहेबः**—म्हणजे काय रावसाहेब ?

**रावसाहेबः**—म्हणजे काय ? नानासाहेब बोला. आणखी किती दिवस आपण ही पळीपंचपात्र घेऊन या सूर्याला अर्घ्य देणार ? त्या अर्घ्यांबरोबरच तुमच्या अंगांत नवीन तेजाचा संचार होण्याऐवजीं, तुमची मुळची तेजस्विताच जर त्या अर्घ्यांबरोबर प्रत्यहीं कमी होत जाऊन, त्या सूर्याच्या तेजांत मिळूं लागली, तर या अर्घ्याचा काय उपयोग ? पानिपतच्या रणांगणावर पराक्रमाची शिकस्त करून, प्रखर तेजाच्या त्या सूर्याला सुद्धां लज्जेनं खालीं मान घालायला लावून, अस्ताला जायला भाग पाडणारे पेशवे, मराठ्यांच्या झेंड्याला अटकेपार नाचविणारे पेशवे, एकोणीसाव्या शतकांत पळीपंचपात्री घेऊन, आपल्या क्षत्रियत्वावर लाथ मारून भिक्षुकी करूं लागले; असाच लौकिक तुम्ही मिळवणार काय ? बोला. नानासाहेब बोला. स्वतःला पेशवे म्हणवून घेण्याचा तुम्हाला काय अधिकार ? न्यायदंडाच्या ऐवजीं, राजदंडाच्या ऐवजीं दर्भाच्या काड्या हातीं धरल्यात म्हणून ? समशेरीऐवजीं हातीं पळी धरलीत म्हणून ?

**नानासाहेबः**—रावसाहेब तुला झालं आहे तरी काय ? बंडवाल्यांनीं तर तुझ्यावर जादू केली नाहीं ना ?

**रावसाहेबः**—होय. आणि तीच जादू तुमच्यावर करण्याकरतां मी आलों आहे. बोला हातीं शस्त्र धरणार कीं दर्भाच्या काड्या ?

**मोरोपंतः**—रावसाहेब, शांतपणानंच कोणत्याही गोष्टीचा विचार केला पाहिजे. या वेळीं शस्त्र उचलण्यापेक्षां, स्वामिद्रोह करून राजद्रोहाचं खापर माथीं फोडून घेण्यापेक्षां, स्वामीनिष्ठ राहून, आपल्याला स्वतःचं हित जितकं साधतां येईल तितकं दुसऱ्या कोणत्याही रितीनं शक्य नाहीं.

**रावसाहेबः**—मोरोपंत–मोरोपंत तुमच्या सर्वस्वाचं वाटोळं झालं या वृत्तीनं ! तरी तुमचं डोळे उघडूं नयेत ?

**मोरोपंतः**—झांशी आमच्याकडे असतांना ती जशी इंग्रजांशीं राजनिष्ठ राहिली, तशीच ती आतांही राहील. स्वार्थापेक्षां आपल्या दानतीवर डाग कधींही न येऊं देण्याकरतां हिंदू आपलं रक्त कुठंही सांडायला तयार होतात, असंच झांशी साऱ्या जगाच्या अनुभवाला आणून देईल ! रावसाहेब, ज्या इंग्रजांनीं अन्यायानं झांशी खालसा केली, त्याच इंग्रजानं तीच झांशी आपखुशीनं आमच्या स्वाधीन केली. याच बंडांत आम्ही आपलं रक्त त्यांच्याकरतां सांडलं; हें पहातांच इंग्रज—दयाळू इंग्रज आमच्याशीं प्रेमानं वागूं लागले. बोला—आम्ही त्यांच्याशीं द्रोह कां करावा ? आमच्या राजनिष्ठेचा अपमान, आमच्या स्वाभिमानाचा अपमान, त्यांच्याकडून झाला का ?

**रावसाहेबः**—भोळ्या मना, झांशी तुमच्याकडे आली हा भ्रम आहे ! इंग्रजी मुत्सद्यांनीं या बंडाच्या वेळीं टाकलेला हा एक बुद्धीचा डाव आहे ! दिवसेंदिवस अवजड होत जाणारा राज्यशकट अशा अडचणीच्या वेळीं, केवळ मानमरातबाच्या भाड्यावारी तुमच्याकडून ओढून घ्यावा; याच्या पलीकडे यांत दुसरा कोणताही हेतू नाहीं ! त्यांच्यावर चालून आलेल्या नथेखानाला तुम्ही आपल्या तरवारीच्या जोरावर मागं फिरवलांत पण या प्रकरणाचे तिढे लवकरच कसे जखडले जातील तें पहा ! या परिस्थितींतून निभावून जातांच, तुम्हांला गादीवरून खाली खेंचून—

**मोरोपंतः**—ज्या क्षणीं तसा प्रसंग येईल, त्या क्षणींच झांशीची तलवार उपसली जाईल ! रावसाहेब, लक्षांत ठेवा हें रक्त अस्सल हिंदूचं आहे.

**रावसाहेबः**—त्याच रक्ताच्या उसळीकरतां आज सारा देश टपून बसला आहे. नानासाहेब, बोला आपण हातीं शस्त्र घेऊन बाहेर पडणार काय ? सारे बंडवाले आपल्या एका शब्दाची वाट पहात आहेत. सांगा, त्यांची निराशा करून साऱ्या समाजाचं अहित करून, समाजद्रोहाचं पातक माथीं घेणार कीं——

**नाना०ः**——पण रावसाहेब साऱ्या समाजाचं मत चुकीचं असेल तर ! कांहीं कारणानं समाजाचं अंतःकरण भडकून मनक्षोभामुळं अविचार होण्याचा संभव जास्त असतो.

**रावसाहेबः**——नानासाहेब, समाजांतील एका व्यक्तीला हे शब्द काढण्याचा मुळींच अधिकार नाहीं ! समाजाचा मी बांधलेला आहे हें तत्व कबूल केल्यानंतर समाजाची इच्छा हीच त्याची इच्छा ! समाजाचं ध्येय तेंच त्याचं ध्येय. नी समाजानं स्वीकारलेला मार्ग, हाच त्याचाही मार्ग ! नानासाहेब मी समाजाचा बांधलेला नाहीं असं म्हणून तुमच्या पेशवाईपदाला काळिमा तरी फासा ! किंवा या वेळीं जनतेच्या मताचा पुरस्कार तरी करा.

**नानासाहेबः**——रावसाहेब, यावेळीं तूं कसं मला अगदीं पेचांत पकडलं आहेस !——काय करूं ?

**रावसाहेबः**——काय करूं ? काय करूं ? या मावळत्या सूर्याकडं दृष्टी फेका. म्हणजे तो तुम्हाला "काय करूं" या तुमच्या प्रश्नाचं उत्तर देईल ! पानिपतच्या रणसंग्रामांत देहाच्या चिंधड्या उडवून घेणाऱ्या, सदाशिवराव भाऊंचा तेजस्वी आत्मा या मावळत्या सूर्यबिंबांत जागृत होऊन, पानिपतच्या समरभूमीवर जिरलेलं पुण्यश्लोक रक्त आज या आकाशांत उसळून, तुम्हाला विचारीत आहे कीं, ही स्वर्गीय रक्तिमा तुमच्या रक्तांत आहे का ? सांगा नानासाहेब, या घटकेला सारा देश हाच माझा संसार. साऱ्या देशाचं कल्याण हेंच माझं कल्याण, असं म्हणायला आपण तयार आहांत काय ? या मावळत्या सूर्याला साक्षी ठेवून, माझ्या देशाचा संसार थाटण्याकरतां, मी माझ्या एकट्याच्या संसारावर लाथ मारायला तयार आहे, अशी प्रतिज्ञा करायची तुमची छाती आहे काय ?

**नानासाहेबः**——या नानासाहेबाची छाती ? रावसाहेब, सदाशिवरावभाऊंनीं ज्या पेशव्यांच्या पराक्रमाचा डंका अलम दुनियेंत आसेतुहिमाचल गाजविला, त्याच पेशव्यांच्या गादीचा——नामधारी का होईना——पण मी मालक आहे ! माझी छाती ? याहीपेक्षां भयंकर प्रतिज्ञा असेल तर सांग ! ती सुद्धां मी करीन. माझ्या एकट्यावर जर साऱ्या देशाचा आनंद अवलंबून असेल, तर हीच प्रतिज्ञा काय, पण देशाच्या इच्छेपर्यंत मी उपाशीसुद्धां रहायला तयार आहे.

**रावसाहेबः**——नानासाहेब, सारा देश आपल्या शब्दाकरतां आतुर

आहे ! या बंडाला राष्ट्रीय स्वरूप देणं आपल्या हातीं आहे ! मिरतचे सारे बंडवाले ब्रह्मावर्ताच्या पायाशीं आज'सेनानीची' भिक्षा मागत आहेत.

नाना० :--माझ्या देशाच्या संसाराकरतां, सौख्याकरतां, मी माझ्या स्वतःच्या संसारावर नी सुखांवर आजपासून लाथ मारली. जा रावसाहेब,तात्या टोपीला बंडवाल्यांची व्यवस्था ठेवायला सांगा ! मोरोपंत, माझ्या मतानं सरकारशीं राजनिष्ठ रहाण्याची मर्यादा संपली असं वाटल्यावरून मी माझा मार्ग स्वीकारला आहे. लक्ष्मीबाईची या बंडांत सरकारशीं राजनिष्ठा रहाण्याची इच्छा आम्हांला पूर्ण करतां येत नाहीं, याबद्दल नाइलाज आहे. जा! सरकारशीं राजनिष्ठा असणारे सारेजण आजपासून आमचे शत्रू झाले आहेत. रावसाहेब, या गंगेला साक्षी ठेवून ही पहा मी माझी ब्राह्मवृत्ति–पळीपंचपात्री गंगार्पण केली. ( पळीपंचपात्री गंगेंत टाकतो. )

राव० :--जा मोरोपंत,जा नी आपल्या राजनिष्ठेच्या जोरावर रणांगणांत आमच्याशीं सामना द्यायला तयार व्हा. दोन वर्षांपूर्वी वाघाच्या शिकारींत, मित्रप्रेमानं तुमच्या हृदयावर शांतपणानं पडलेला हा हात आतां तुमच्या गळ्यावर पडायला तयार झाला आहे ! जा.

मोरोपंत:--रावसाहेब, हे युद्धाचं आव्हान मीं मोठ्या आनंदानं स्वीकारतों ! हा मोरोपंत जोपर्यंत इंग्रजांशीं राजनिष्ठ आहे तोपर्यंत आपल्याशींच काय पण साऱ्या बंडवाल्यांशीं सामना द्यायची त्याची तयारी आहे. इंग्रजांनीं जोंपर्यंत आमचा अपमान केला नाहीं. तोंपर्यंत झांशी आपल्या स्वामीशीं कधींही बेइमान होणार नाहीं, आपल्या धमकीला बिचकून हा मोरोपंत एक पाऊलही मागं सरणार नाहीं हें पूर्ण लक्षांत ठेवा. एवढंच नव्हे तर या क्षणीं या ठिकाणीं या राजनिष्ठ मोरोपंताची एकाकी तलवार माझ्या शत्रूच्या या चक्रव्यूहांत तुमच्यासारख्या बंडखोरांची--

रावसाहेबः—हं खबरदार.

मोरोपंतः—पुन्हाही म्हणतों बंडखोरांची लढाईची हौस पूर्ण करायला तयार आहे. या देहांतून तुमच्या निमकहराम तलवारींनीं फोडली जाणारी रक्ताची प्रत्येक चिळकांडी आपल्या तेजस्वी लालीनं जगाला सांगेल कीं, मोरोपंत तांबे राजनिष्ठ होता ! लक्ष्मीची झांशी राजनिष्ठ होती ! या मोरो-

पंताच्या अंगांत संचार करणारा रक्ताचा प्रत्येक बिंदू आपल्या शीलाकरतां प्रत्यक्ष देशबंधूंशीं लढायला तयार आहे समजलांत?

**रावसाहेबः**—आणि तुम्हीही लक्षांत ठेवा कीं, असल्या देशबुडव्या राजनिष्ठांचीं हाडं, देशाकरतां पिंजून टाकायला हा रावसाहेबही तयार आहे.

**मोरोपंतः**—हीं हाडं पिंजून जातील पण राजनिष्ठच रहातील! तर याची प्रचिती रावसाहेब जर आपल्याला पहायची असेल—ही पहा—या मोरोपंताची तलवार बाहेर आहे. (तलवार उपसतो) आपल्याविरुद्ध झांशीनं रणशिंग फुंकायच्या आधीं या मोरोपंताच्या समशेरीचा खणखणाट, झांशीच्या राजनिष्ठेला खडबडून जागं करील.

**रावसाहेबः**—परस्परांच्या भिन्न मार्गांवर पाऊल टाकतांना ज्या ठिकाणाहून हे मार्ग फुटले त्या ठिकाणीं जर आपल्या उभयतांच्या रक्ताची निशाणी होणार असेल तर त्यालाही हा रावसाहेब तयार आहे. (तलवार उपसतो.)

**नानासाहेबः**—(मध्यें येऊन) नाहीं हा विधिसंकेत नाहीं. रावसाहेब, मोरोपंत, भावी रक्तपात या पवित्र गंगातटाकीं होतां कामा नये! तर आपल्या पवित्र ध्येयांची सुरवात या ठिकाणी झाली पाहिजे. मोरोपंत तुमची राजनिष्ठा, लक्ष्मीबाईची राजनिष्ठा जर देशाच्या कारणीं लागली तर खात्रीनं देशोद्धाराचं मंदीर हां हां म्हणतां वर चढेल! तुमच्या स्वर्गीय स्वामि सेवेची किंमत या कालांत अगदींच अल्प होणार!

**मोरोपंतः**—दैवयोगानं जर तसा अनुभव आलांच तर नानासाहेब आमचा मार्ग चुकला असं समजून, आम्ही आपल्या मार्गाकडं आनंदानं वळू.

**नानासाहेबः**—महाराणीची भेट यापुढं आम्हाला उघडपणानं घेतां येईल का?

**मोरोपंतः**—नाहीं, मुळींच नाहीं! राजनिष्ठेला बाध आणणारी कोणतीच गोष्ट यापुढें आमच्या हातून होणार नाहीं! नानासाहेब, रावसाहेब माझ्या कठोर वर्तनाबद्दल न रागावतां, एकेवेळीं असणारे माझे अन्नदाते

म्हणून या आपल्या सेवकाचा, पण पुढं आपला मार्ग रोखून धरणाऱ्या आपल्या शत्रूचा, हा शेवटचा प्रणाम घ्या.

( नमस्कार करतो. )

**रावसाहेबः**——जा मोरोपंत–जा! राजनिष्ठेनं रोमरोमांत फुलून गेलेल्या स्वर्गीय आत्म्या, तुझ्या अचल मनाचं कौतुक करावसं वाटतं. पण आमच्या दुर्दैवानं त्याच्यावर यापुढें कठोर प्रहारच करावे लागतील याची क्षमा कर ! !

( एकमेकांना नमस्कार करतात. )

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळः——झांशी–सुंदरलालचें घर. कामिनी येते. ]

**कामिनीः**——संक्रांत सगळ्यावर येते; पण मेली बायकांवर येऊन ही सुंदर कशी टळत नाहीं ! देव जाणं. वाड्यांत पहावं तर बाईसाहेबांची लाडकी हीच ! सर पाळेकरीण हीच. नी बाईसाहेबांचा राग कुणावर ? तर माझ्यावर ! घरीं पहावं तर देवांच्या गुणांचा नवरा. पण त्यालासुद्धां ही सुंदर अष्टौप्रहर वैलातनं काढते नी चुलीत घालते; नी चुलीतनं ओढते नी वैलांत कोंबते. खरंच या सुंदरलालच्या गुणानं मला अगदीं वेड लागायची वेळ आली आहे ! " तुझ्यामागं मीं सुंदर लालशीच लग्न करीन " असं देवीच्या पायांना साक्षी ठेवून, मी हिला वचन दिलं. त्याला आज तीन वर्षे झालीं असतील; पण मेली अजून मरत नाहीं. मला वाटतं ही तर कांहीं मरणार नाहींच. पण शपथ मोडली तर देवी मला मात्र मारणार ! नाहींतर शेवटी या प्रेमरोगानं तरी मी मरणारच! एकंदरींत मात्र माझं ओढवलं आहे खरं–सुंदरलाल माझे, अहो सुंदरलाल?

**सुंदरः**——( प्रवेशून ) तक्षक–तक्षक–काळभैरव–काळभैरव ! !

**कामिनीः**——अहो तक्षक काळभैरव काय म्हणतां ?

**सुंदरः**—कोण कामिनी ? मला वाटलं माझी लाडकी नागीण ! तक्ष-

काच्या नांवानं तिला बांधणार होतो नी काळभैरवाचा सोटा तिला दाखवणार होतों. पण पाहातो तो ही माझी कामिनी !

**कामिनीः**—खरंच सुंदरलाल, या कर्कशेच्या तावडींतून कसं हो सुटावं?

**सुंदरः**—खरंच ती घरांत नाहीं; तरच एकादी युक्ती सुचते का पाहूं. तिच्या देखत अशीं घाटाघाट करायची निदान माझी तरी छाती नाहीं.

**कामिनीः**—मला सुद्धां तिचं भयच वाटतं. नथेखानाशीं पर्वा लढाई झाली; तेव्हां लढतांना किती पण भयंकर दिसत होती ! एकेक डोळा एव्हढाला.

**सुंदरः**—त्याचा अनुभव मला आहे. रागानं एकदां कां तिनं डोळे वटारले कीं, मी सगळाच त्यांत जातों कीं काय असं वाटून मी डोळे झाकून घेतों !

**कामिनीः**—रक्तानं चिंब झाली होती. त्यावेळीं तर तिच्याकडे बघवत नव्हतं ! नुसता चंडिकेचा अवतार दिसत होता !

**सुंदरः**—रागावली म्हणजे मलाही हा देखावा दिसतो खरा. मी देवीला एक नवस करणार आहे.

**कामिनीः**—कोणता ?

**सुंदरः**—कीं देवी माझ्या बायकोला एकदां सपाटून राग आण नी त्या रागाच्या भरांत झटक्यानं ताठून तिला मरूं दे.

**सुंदरः**—( प्रवेशून ) अस्सं ! कोण कामिनी ?

**सुंदरः**—अरे बापरे ! मेलों वाटतं ! कामिनी अग तूं तरी जिवंत आहेस का ? मेली असलीस तर सांग ! वीज पडल्यामुळें माझे डोळे गेले. मला कांहीं दिसत पण नाहीं नी समजत पण नाहीं.

**कामिनीः**—सुंदरलाल, जाते हो जाते मी.

**सुंदरः**—कामिनी–अहो भटजी.

**सुंदरः**—अजून मी जीवंत आहे बरं का ? यापुढं जीव वांचवायचा असेल तर यःपलायते—

**कामिनीः**—आतां काय करूं ? माझे पण पाय लटपटताहेत.

**सुंदरः**—माझी पण तीच दशा आहे–तूं त्या दारानं पळ. मी या खिडकींतून उडी घेतों.

सुंदरः—खबरदार कामिनी ! तेथून हालशील तर शपथ आहे तुला ! हां भटजी—

सुंदरः—अरेच्या ! नवऱ्याला भटजी म्हणते ? अगं कामिनी मी सांपडलो पण तूं तरी आपला जीव वांचीव.

कामिनीः—अहो, मेलीन शपथ घालून माझे पाय मोडलेत ना ?

सुंदरः—तर मग आटोपलाच सारा कारभार ! देवी, शरण आहे.

सुंदरः—तुम्ही दोघेही आज अचूक सांपडलां आहांत.

सुंदरः—कसूर माफ ! कामिनी अग चुडेदान मागून घे.

सुंदरः—पुन्हा तोच गुन्हा ? देवीची शपथ तुम्ही कां मोडलीत ?

सुंदरः—मुळींच मोडली नाहीं.

कामिनीः—अहो मोडली म्हणा. खोटं बोलूं नका. देवीचा राग होईल हो राग होईल !

सुंदरः—अग घाबरूं नकोस.

सुंदरः—तुम्ही शपथ मोडली नाहीं काय ?

सुंदरः—अर्थात ! तुझ्या मागं कामिनी माझी पत्नी ना ? झालं तर मग, ' मागं ' म्हणजे गैर हजेरींत ! देवीचा देव आलां तरी खोटं ठरणार नाहीं

सुंदरः—हें शब्दांचे डावपेंच नकोत.

सुंदरः—नव्हे हे डावपेचाचे शब्द आहेत.

सुंदरः—अहाहा ! काय पण अकल ? दिवे ओवाळा अकलेवरून !

सुंदरः—मग भागलं ! दिवाळींत नर्कचतुर्दशीच्या पहाटे माझ्यावरून प्रेमानें दिवे ओवाळतेस, तेव्हढेच पुरेत कीं—प्रेमांत असतांनासुद्धां त्या दिव्यानं जर मला भाजायची वेळ आणतेस, तर माझी खोड मोडण्याकरतां माझ्या अकलेवरून दिवे ओवाळतांना मला जाळूनच टाकशील कीं !

सुंदरः—तुम्हाला काय म्हणावं हो ?

सुंदरः—तुमच्या अगदीं उलट—पुरुष !

सुंदरः—बस्स पुरे करा हा चावटपणा !

सुंदरः—बंद—तोंड एकदम बंद ! आतां अधिक बोलेन तर मार खाईन.

सुंदरः—कायगं कामिनी, माझ्या घरांत मी नसतांना तूं कां आलीस ?

सुंदरः—तूं आहेस कीं नाहीं हें बघायला.

कामिनीः––घर आहे सुंदरलालचं !

सुंदरः—ठेवलं आहे त्यांच्या काकाचं !

सुंदरः––हो तुझंही नाहीं माझंही नाहीं नी तिचं तर नाहींच नाहीं ! ज्याचं घर तो गेला स्वर्गांत ! तूं खुशाल या घरांत ये गं !

कामिनीः––मीं यांना भेटायला आलें होतें समजलीस ?

सुंदरः––नी मी परवानगी दिली होती. कळलं ?

सुंदरः––तुमची परवानगी गेली चुलींत ? बाईसाहेबांना सांगूनच हिची चांगली खोड मोडते. पण या घरगुती भानगडींत बाईसाहेब पाहिजेत कशाला ? माझे हात कुठं केळीं खायला नाहीं गेले !

( कामिनीला मारायला धांवते. सुंदरलाल मधें उभा रहातो.)

सुंदरः––अररं ! धांवा धांवा ! खून खून.

कामिनीः––अहो हें काय सुंदरलाल ? ही कैदाशीण तुमचासुद्धां चावा घेईल बरं !

सुंदरः––धांवा धांवा ! खून–खून.

सुंदरः––काय उगीच ओरडत सुटला आहांत ? खराच खून झाला कीं काय म्हणून सारा गांव गोळा होईल अशा ओरडण्यानं !

सुंदरः––आमचा जीव गोळा होतांना आम्ही ओरडलों नी सारा गांव गोळा झाला तर त्याला आम्ही काय करणार ?

कामिनीः––कशाला तिच्या तोंडी लागतां ?

सुंदरः––तुझं तोंड शाबूद राखण्याकरितां.

कामिनीः––काय हो तुमचं प्रेम ? रूप नाहीं पण अगदीं देवरूप आहांत.

सुंदरः––कायगं कामिनी यांच्यावर तुझं प्रेम असलं तरी तुझं अजून लग्न व्हायचं आहे ना ? कुंवार असतांना पुरुषांशीं अशा चोरून गप्पा मारायला तुला शरम नाहीं वाटत ?

कामिनीः––पण उघडपणानं गप्पा मारल्या तर तुझ्या पोटांत पोटशूळ उठतोना ?

सुंदरः––माझ्या धाकानं सवत अगदीं वाळली गं बाई वाळली ! काय हो ?

सुंदरः––हो तर? तिचा नी माझा गांधर्व विवाहसुद्धां लागला ?

कामिनीः––डोंबलं माझं.

सुंदरः––काय–गांधर्व विवाह ? असं काय ?

सुंदरः––हो हो गांधर्व विवाह ! देव प्रणित गांधर्व विवाह.

कामिनीः–अहो काय बरळताय हें तुम्ही ? तुम्हांला वेड कां लागलं ? अहो शपथेची कांहीं आठवण ?

सुंदरः––घसरलों वाटतं !

कामिनीः––अहो वाटतं कसलं ? सपशेल घसरलांत. किती भोळे तुम्ही ? याच भोळेपणानं मी तुमची झालें.

सुंदरः––काय हो माझा असा गळा कापायचा होतात, तर माझ्याशीं लग्न तरी कशाला केलेंत ?

सुंदरः––पण मला काय माहीत कीं, माझं सणंग इतकं जाडं भरडं नी डोईजड निघेल म्हणून ?

सुंदरः––आधीं घेतलीत कशाला डोकीवर ?

सुंदरः––हा शहाणपणा त्या देवाच्या देवानं, त्या महादेवानं जर आम्हांला शिकविला नसता तर ही घोडचूक मी खात्रीनं केली नसती. शंकरानं मस्तकावर घेतली गंगा; पण माझ्या डोक्यांत पडली ही बिजली! देवा, तुझ्या घरचा रंगारी मलाच तेवढा सफेदा द्यायचा कसारे विसरला ? साहेब नसतो कां झालों ? अग कामिनी तूं तरी एकादी सायबीण कां नाहीं झालीस ?

कामिनीः––पण इतके होण्यापेक्षां झालेली लग्नंच मोडतां आली असती तर ? किती हो छान झालं असतं ? तरी पण हिला दिलेली शपथ आपल्याला नडलीच असती.

सुंदरः––सुंदर सुंदर !

कामिनीः––अगंबाई म्हणजे ! अहो सुंदरलाल तिला सुंदर काय म्हणतां !

सुंदरः––अलं रुदितेन ! अलं रुदितेन ! सुंदर सुंदर या अपराध्यांना एकदां क्षमा कर.

सुंदरः––तुम्ही शपथ मोडली असं कबूल करा.

कामिनीः––कबूल पण एकदां शांत हो ! वाटल्यास मी नेहमीं तुझ्याजवळ राहीन. तुझ्यामागं यांच्याशीं बोलणारसुद्धां नाहीं ! पण आतां छळूं नको यांना.

सुंदरः––तूं बोलली नाहींस तर मीच तुझ्याशीं बोलत राहीन त्यांत काय आहे !

सुंदरः––विचार करून सांगतें !

सुंदरः––विचार म्हणजे प्रलय ! कामिनी हिचा विचार होईपर्यंत आपण देवीचें ध्यान करूं.

सुंदरः––अहो ध्यान ! एका अटीवर माफीच नाहीं तर तुम्हां दोघांना मोकळेपणानं वावरूं सुद्धां देईन.

सुंदरः––वाहवा ! कामिनी पुढं ये. देवी प्रसन्न होऊन आशिर्वाद ओरडायच्या बेतांत आली आहे.

सुंदरः––हां वडबड–

सुंदरः––बंद–एकदम बंद–कोणती अट ?

सुंदरः––मी सांगेन त्याप्रमाणें ऐकायचं.

सुंदरः––यांत कोणकोणत्या अटीचा समावेश होतो ?

सुंदरः––नथेखान पुन्हां केव्हां लढाई सुरूं करील याचा नेम नाहीं. म्हणून प्रत्येकाला स्वसंरक्षणाकरतां तरी लढतां यावं; अशी बाईसाहेबांची इच्छा आहे. म्हणून तुम्ही दोघांनीं माझ्यापासून तें शिक्षण घेतलं पाहिजे.

कामिनीः––लढाई ! अगबाई ! नुसता कांदा कापतांनासुद्धां माझे डोळे पाण्यानें भरून येतात; मग माणसं मारतांना माझं कसं होणार ? मी ही अट–

सुंदरः––कर कबूल. कबूल ! त्यांत काय आहे ? लढाई शिकायला कशाला पाहिजे ? या क्षणीं पाहिजे तर लढून दाखवितों.

सुंदरः––असे बायकोच्या नथींतून तीर मारणारे वीर दमडीला हजार मिळतात !

**सुंदरः**—अगदीं बोल बोलूं देईनास ! अग पण त्यांत सुद्धां शिताफी पाहिजे. नाहींतर नथीतनं तीर मारतां मारतां नथीबरोबर नाकच मारलं जायचं. अट कबूल कर कामिनी–

**सुंदरः**—नुसतं कबूल करून चालायचं नाहीं. शपथ पाहिजे.

**कामिनीः**—शपथ ? कसं हो करूं सुंदरलाल ? मला बाई देवाचं भय वाटतं !

**सुंदरः**—अगं देव काय भुतं आहेत ? पुण्याप्रमाणें पापाचाही पाठीराखा देवच. तसं जर नसतं तर पाप हा शब्दच मुळीं ऐकूं आला नसता ! अगं "आलीया भोगासीं असावें सादर। देवावरी भार घालुनियां" या अभंगवाणींत हीच मख्खी आहे ! शपथ घेऊन सारा भार देवावर टाकूं या. म्हणजे शपथ मोडल्याचं पापसुद्धां त्याच्याकडंच जाईल ! आतां काय बाईसाहेब मूर्तिमंत रणदेवता, ही त्यांची लाडकी बिजली नी तूं बडी लढवय्यी होणार ! अशा रितीनं बायकांची एक फलटणच तयार करून, प्रामिलेचं राज्य पुन्हां एकदां सुरू होऊं द्या. म्हणजे झालं. या जनानी वीरांना जिंकायला या काळांत अर्जुन पुष्कळच आहेत. कर अट कबूल.

**कामिनीः**—बरं कबूल ?

**सुंदरः**—चला तर देवीच्या देवळांत. ( जातात. पडदा. )

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—झांशी. लक्ष्मीचा महाल. रात्रींची वेळ. प्रवेश सुरू होतांच दूर अंतरावर रात्रींच्या एकाचा तास वाजतो. ]

**रावसाहेबः**—मध्यरात्र झाली. या आर्यावर्ताची बाहेर निघालेली स्वातंत्र्यलक्ष्मी, परत फिरविण्याचा आशाकिरण या हृदयांत बाळगून या चालत्या बोलत्या लक्ष्मीच्या मंदिरापर्यंत तर आलों. लक्ष्मी, इंग्रजानीं तुझ्याविरुद्ध तरवार उपसली, तुला बंडखोर ठरवलं, हें ऐकून तुझ्या हृदयाचे तुकडे तुकडे उडाले असतील, पण माझ्या मनांत आनंदाच्या लाटा उसळताहेत ! कारण, स्त्रियांचीं मनं स्त्रियानींच वळवितां येतात; या

न्यायानं जर या आर्यावर्ताच्या रुसून जाणाऱ्या भाग्यलक्ष्मीचा तूं हात धरलास, तर लक्ष्मी ती भाग्यलक्ष्मी, हिंदुस्तानची स्वातंत्र्यदेवता खात्रीनें मागें फिरेल. या वेळींच रोज साहेबाचा निर्वाणीचा खलिता, राणीला मिळाला असेल तर काय बहार होईल. होऊं का पुढं ?

सुंदरः—कोण ? कोण तें ?

रावसाहेबः—चोर नव्हे तसा वैरी पण नव्हे !

सुंदरः—कोण रावसाहेब ? नी अशा अपरात्रीं ?

रावसाहेबः—तशाच कारणांमुळं–राणीसाहेब.

सुंदरः—आतांच थोडा डोळा लागला—

( पडद्यांत–लक्ष्मी–कोण ? कोण ? )

सुंदरः—बाईसाहेबच आल्या वाटतं !

रावसाहेबः—जरा बाजूला हो पाहूं. ( जातात, ) ( लक्ष्मी स्वप्नांत चालत येते. )

लक्ष्मीः—कोण तूं म्हणालीस ? झांशीची रक्षणकर्ती देवता ? ( महालाच्या मध्यभागावरील पडदा दूर होऊन, शंकर किल्ल्याच्या एका बुरुजावर केस मोकळे सोडलेली व रक्तवस्त्र धारण केलेली स्त्रीमूर्ती दिसते. ) मग मी काय करूं ? हें काय ? तूं मला बोलावतेस ? मला बोलावून काय करणार तूं ? अगबाई ! तूं कुठं नी मी कुठं ? काय म्हणालीस ? मी मनांत आणलं तर तुझ्याजवळ येईन ! कशी. कशी ? बरं येईल ? मी एक दीन अबला ! मी मानवी कोटींतली आहे ! तुझ्यासारखी देवता कुठें आहे ? अशी हंसतेस काय गडे ? पहा. पहा पुन्हां आपलं तेंच ! पण हें काय ? हे धुराचे लोटच्या लोट कुठून उठूं लागले ? ( मागील जाळीच्या पडद्याआडून धुराचे लोट दिसूं लागतात. ) नी तूं हें काय करतेस ? तूं हे झेलतेस काय ? तोफेचे गोळे ? अगबाई ! लाल लाल !–मावळत्या सूर्यापेक्षांही भडक–काय म्हणालीस त्या गोळ्यांचा तुझ्यावर कांहींच परिणाम होत नाहीं ? कांहीं तरीच सांगतेस झालं ! पाहूं पाहूं तुझे हात ? काळे ठिक्कर पडले ते ! काय ? माझ्यावरही हाच प्रसंग येणार ? तुझं तें रक्तवस्त्र म्हणजे माझ्या भावी संकटाची सूचना होय ? वा ग वा ! अशानं मी भिऊन जाईन असं का तुला वाटतं ? अशी जवळ काय येतेस ?

**रावसाहेबः**——( प्रवेशून ) अहाहा ! देवता मूर्तिमंत पावित्र्य !

**लक्ष्मीः**——कोण—कोण ते ?

**रावसाहेबः**——लक्ष्मी—

**लक्ष्मीः**——( विचकून ) काय मी पहाते ? आतांपर्यंत मी स्वप्नांत होते कां ? कोण ?

**रावसाहेबः**——ताई, बिचकूं नकोस. माझ्या अज्ञात स्वरूपाला भिऊं नकोस. ताई, पापी विचार या हृदयांत मुळींच नाहींत एव्हढं आश्वासन तुला माझ्याशीं शांतपणानं बोलूं देईल ना ? ताई—

**लक्ष्मीः**——आधीं बुरखा दूर करा नी मग बोला.

**रावसाहेबः**——मनू, हा बुरखा तुझ्या आज्ञेनं मी या क्षणीं दूर करतो. पण या आर्यावर्ताच्या तोंडावर पडत चाललेला या गुलामगिरीचा बुरखा कोण केव्हां दूर करणार ? ताई, नको अशी मागं सरूं नकोस, हा पहा हा काळा पडदा या रावसाहेबाच्या तोंडावरून दूर झाला. ( पडदा दूर करतो. )

**लक्ष्मीः**——कोण—श्रीमंत ?

**रावसाहेबः**——नाहीं, हा रावसाहेब श्रीमंत नाहीं. या झांशीच्या लक्ष्मीचा भाऊ, ताई तुझ्याजवळ एका आश्वासनाची याचना करणारा एक कंगाल आहे !

**लक्ष्मीः**——बोला श्रीमंत, ही लक्ष्मी आपल्या शीलाला धक्का न लागूं देणारं कोणतंही आश्वासन आपणांस द्यावयास तयार आहे.

**रावसाहेबः**——पवित्र नी मंगल ! मनुताई, माझी विनंति इतकी पवित्र आहे कीं, तिच्यामुळं तुझ्या शीलाला डाग न लागतां उलट त्याचं तेज अधिकच खुलून दिसेल. दे. वचन दे.—या रावसाहेबाला देशोद्धाराचं वचन दे. ! तुझ्या शीलाला यापासून कमीपणा नाहीं ! तुझ्या वंशाला यापासून बट्टा नाहीं ! ताई, तुझ्या वंशाचा यापासून भाग्योदय आहे.

**लक्ष्मीः**——हें घ्या वचन ! माझ्या शीलाला न दुखवतां, मी आपल्याला मदत करायला तयार आहे. ( वचन देते. )

**रावसाहेबः**——तर मग मनू , सांग, निरपराध्यांना कुत्र्याप्रमाणं यमाच्या दरबारांत धाडणारांच्या विरुद्ध तूं लढायला तयार आहेस का ? स्वतःच्या

मानाकरतां, स्वतःच्या वैभवाकरतां, दुसऱ्याच्या वैभवावर जळते निखारे ठेवून, त्यांच्या वैभवाची रक्षा करणाऱ्या सत्तेशीं झुंजायला तूं तयार आहेस काय ? तुझ्या मातृभूमीची गुलामगिरी टाळण्याकरतां ताई, तुझी तलवार म्यानाबाहेर उसळेल का ? बोल, ताई बोल. माझ्या प्रश्नांचीं उत्तरं दे.

लक्ष्मीः--हां रावसाहेब, समजला आपला हेतु ! ही झांशीची गादी पेशव्यांकडून जरी आमच्याकडं आली असली, तरीपण मी इंग्रजांशीं विनाकारण कधींही बेइमान होणार नाहीं. लक्ष्मी आपलें वचन पाळायला ज्याप्रमाणें स्वतःचे प्राण अर्पण करायला तयार आहे, त्याचप्रमाणें आपल्या राजनिष्ठेकरतां–

रावसाहेबः—राजनिष्ठा! राजनिष्ठा ! कुठपर्यंत तूं राजनिष्ठ राहणार ? तुझ्या राजनिष्ठेच्या देवतेला, दिवसाढवळ्या चव्हाट्यावर आणून, तिची वाटेल तशी विटंबना केली, तुला बंडखोर ठरवलं––

लक्ष्मीः—काय बंडखोर ?

रावसाहेबः--हो बंडखोर-झांशीची लक्ष्मी बंडखोर ! मनूताई, तुझी दिव्य राजनिष्ठा इंग्रजांच्या न्यायी दरबारांत बंडखोर ठरली तरी सुद्धां तुझ्यापुढं वस्तुस्थितीचा प्रकाश पडूं नये ? स्वराज्यावर पाणी सोडणारे साधू बाजीराव मेले गेले ! त्यांच्या हाडांची राख सुद्धां दिसणार नाहीं. पण मनू, त्यांच्या नादान कृत्याकडं तुच्छतेनं पहाणारा हा नव्या उसळीचा हिंदुस्थान, तुम्हाला अनुकूल काळ येतांच, तुम्ही आपल्या प्रगतीचा मार्ग चोखाळला नाहीं, म्हणून तुमच्या जिवंतपणीं तुमच्या तोंडावर थुंकेल तो !–

सुंदरः—( लखोटा घेऊन प्रवेशते ) बाईसाहेब, मामासाहेबांनीं हा खलिता आपल्याकडं आतां ने म्हणून पाठविला आहे.

रावसाहेबः—( बाजूस ) हाच तो रोज साहेबाचा निर्वाणीचा खलिता नाहीं ना ?

लक्ष्मीः—( वाचून ) हें काय मी पहातें ?

रावसाहेबः--हें काय ? मनू, माझ्या ताई, तुझ्या राजनिष्ठेचा हा अपमान ! तुझ्या राजनिष्ठेची ही विटंबना !

लक्ष्मीः--होय रावसाहेब, आपलं म्हणणं खरं ठरलं.

**रावसाहेबः**—बोल ताई, अजून तरी तूं आपलं वचन पाळायला तयार आहेस का ?

**लक्ष्मीः**—नका रावसाहेब बोलूं नका. यावेळीं माझी स्थिती फारच चमत्कारिक झाली आहे. माझ्यांत धड उभं रहाण्याचंही सामर्थ्य नाहीं ! रावसाहेब, ही भूमि माझ्या पायाखालीं दुभंग होत असल्याचा मला भास होतो. शेषाच्या मस्तकावर असलेला हा जगाचा मनोरा डळमळूं लागला, असं मला वाटतं. थांबा रावसाहेब थांबा, माझं डोकं थोडं शांत होऊं द्या. ( लक्ष्मी कोचावर बसते. )

**सुंदरः**—हा काय गोंधळ झाला ?

**रावः**—हे पहा तुझ्या बाईसाहेबांना थोडी झोंप घेऊं दे.

**लक्ष्मीः**—झोप ! रावसाहेब आतां कसली झोप ? जा रावसाहेब बाबांच्याकडे जा. अजून मनाचा एक निश्चय होत नाहीं. उद्यांपर्यंत थांबा. उद्याच्या दरबारानंतर या लक्ष्मीचं आपणांस शेवटचं—निर्वाणीचं उत्तर मिळेल.

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश चवथा

[ **स्थळः**—झांशी, मोरोपंताचा दिवाणखाना. मोरोपंत येतात. ]

**मोरोपंतः**—अरेरे काय झालं हें ? झांशीनं प्रजेचा द्रोह केला ? स्वकीयांचे बळी घेतले ! आणि शेवटीं ज्यांना जवळ केलं त्या—त्या इंग्रजांनीं झांशीकरांना आज अराजक ठरवलं. मनू—मनू आज तुझी काय स्थिती झाली असेल ! तुझ्या हृदयपुष्पाचा आज चुराडा उडाला असेल ! परमेश्वरा, कठोरहृदयी देवा, काय हे तुझे खेळ ! एकाद्या उद्यानांत वालुकामय मार्गावर बसून, त्याच वाळूच्या कणाशीं खेळता खेळतां—शेजारीं फुललेल्या एकाद्या सुकुमार फुलाचा चोळामोळा करणाऱ्या बालिश हृदयांतनी तुझ्या लीलामय अंतःकरणांत काय अंतर ! भावी परिस्थितीशीं झगडण्याकरतां कोणत्या शक्तीचा धावा करूं ? अस्मानांतून एकदम तुटून

पडणाऱ्या स्वतंत्र तेजःपुंजांनो—या स्वतंत्र होणाऱ्या झांशींतील जिवांच्या डोळ्यांत शिरून त्यांचं तेज इतकं वाढवा कीं, मूर्तिमंत स्वातंत्र्य प्रकट होईल. ( सेवक येतो. )

**सेवकः**—एलिस साहेब भेटीला आले आहेत.

**मोरोपंतः**—एलिससाहेब ! कां बरं आले ? जा, त्यांना पाठवून दे. ( सेवक जातो. एलीस येतो. )

**एलिसः**—नमस्कार मोरोपंट मला काई खाजगी बोलायचं हाय !

**मोरोपंतः**—खुशाल बोला.

**एलिसः**—नठेखांशी आपल्या जालेला लडाईचा आमचा गव्हर्नर जनरल शायबाचे मनावर बलटाच इफेक्ट—ऑं परिनाम होऊन—

**मोरोपंतः**—असं म्हणण्यापेक्षां नथेखानानं तुमची तुमडी भरून तुमचे कान फुंकल्यामुळें म्हणानात—

**एलिसः**—कसानं कां होना पन टेनी टुमच्यावर जंनरल सर ह्यू रोज येना पाटवलं हाय ! टवा टेंच्याकडून आज इन्क्वायरी केली जायल टर शामोचारानं उट्टर—

**मोरोपंत**—सामोपचार ! सामोपचार ! साहेब आतां कसला सामोपचार ? आमच्या आजपर्यंतच्या राजनिष्ठेचे असे धिंडवडे प्रतिक्षणाला निघत असतांनासुद्धां, जर आम्ही आतां सामोपचारानं वागलों, तर आमचे पूर्वज स्वर्गातून आमच्या तोंडावर थुंकतील ! या झांशीच्या गादीवर येऊन गेलेल्या महाभागांचे आत्मे, आमच्या या निःसत्व भेकड कृत्याबद्दल आपणहून संततीहीनांच्या नरकांत उड्या घेतील. साहेब, सांगा, सामोपचार अजून करतां येणं शक्य आहे का ? तुम्ही जर आमच्या जागीं असतां तर काय केलं असतंत ? तुम्ही शांत राहिला असतात काय ?

**एलिसः**—No, never खाट्रीनं नसटों ! पण मोरूपंत जरा बेटानं, घेटलं टर अजून दोनीबी बाजू-कडाचिट शांत होटील ! रोज आपनाशीं बहुटेक शामोपचारानचं वागटील ! टुमच्याबद्दल मला फार वाईट वाटटो !

**मोरोपंतः**—हे कुणाचे शब्द ! इंग्रजाचे—एका इंग्रजाचे ! अहाहा साहेब, गंगधररावांनीं आपल्याला ' महात्मा ' म्हटलं, तें अगदीं योग्यच

म्हटलं ! साहेब साऱ्यांच इंग्रजांचीं अंतःकरणं जर तुमच्यासारखीं असतीं तर आज हिंदू नीं इंग्रज बंधुभावनेनें नसते का वागले ?

**एलिसः**—Of course ! वागलेबी अशटे ! पन टशा होनं शक्य नाय ! मोरोपंत टुमच्या ढर्माच्या आड येऊं नाय असा मला किती टरी वाटटो ! पन करणार काय ! झांशी या पुरंबी राजनिष्ठ ऱ्हावी आशी माझी फॉर ईच्छा हाय !

**मोरोपंतः**—ती ठेवणं किंवा न ठेवणं आपल्या हातीं आहे !

**एलिसः**—या वक्तीं रानीशापचं मन आपन शावरलं पाहिजे !

**मोरोपंतः**—ज्याचं स्वतःचंच मन भडकून गेलं आहे, तो दुसऱ्याचं मन कसं सावरणार ? साहेब, लक्ष्मीचं मन सावरून–सावरण्यासारखं नाहीं. रोज झांशीवर चालून आले हे ऐकल्यापासून तिचं मस्तक फिरून गेलं आहे !

**एलिसः**—काय होनार ? God knows ( गॉड नोज. )

**मोरोपंतः**—होणार ! आमच्या प्रश्नाचा योग्य तो निकाल लागला नाहीं; आमच्या राजनिष्ठेचा योग्य तो मोबदला जर आम्हांला मिळाला नाहीं तर परिणाम ठरलेलाच आहे ! लक्षांत ठेवा. साहेब, आम्ही हिंदू स्वामीकरतां प्राण देऊं पण स्वामीकडून अपमान करून घेणार नाहीं. कालचक्राच्या गिरकीबरोबर भिरकावून दिलेल्या प्राण्यांना दुर्दैवानं, त्यांच्या सेव्य स्थितीऐवजीं सेवक बनावं लागतं पण त्यामुळं त्यांची मानसिक योग्यता, हृदयांत संचारणाऱ्या दैवी शक्ती कधींच लुप्त होत नाहींत. जित झाले म्हणून कांहीं मेलेले नसतात. जेत्यांना तेवढी अंतः-करणं नी जितांना अंतःकरणच नाहींत का ? बोला जितांना मान नाहीं का ? साहेब, तुमच्याकरतां स्वतःचे जीव देणाऱ्या जितांना अभिमान नाहीं का ?

**एलिसः**—अशा कशा व्हईल ? मोरूपंत टुमच्या शारक्या इचारी मानशाचा शूडां डोक्शा जर फिरून गेला टर मंग रावशाप नानाशापला डोश काय म्हून डेवा ? खराच-झांशीच्या बाबट अन्याय झाला हाय.

**मोरोपंतः**—बोरछाच्या राजाला दत्तकाचा हक्क तहनाम्यांत नसतांना त्याच्या पश्चात् तें संस्थान कायम रहातं ! दत्तकाची परवानगी त्या

संस्थानला देण्यांत येते. पण झांशीच्या तहनाम्यांत दत्तक घेण्याचा अधिकार स्पष्ट दिसत असून सुद्धां झाशी खालसा होते. हा न्याय का !

**एलिसः**——पन मोरुपंत माजी आपनास एक रिक्वेस्ट हाय ! आपन होईल टिटक करून रानीशाबाचं मन आवरून धरा ! आजच्या डरबारांत रोज शाबाच्या प्रटीनीडीला होईल टिटकी शांट उट्टरं——

**मोरोपंतः**——त्या प्रतिनिधीकडून अपमानाचा एक जरी शब्द आला तरीसुद्धां लक्ष्मीची तलवार आज बाहेर पडेल !

**एलिसः**——पन माजी आपनास रिक्वेस्ट हाय ना !

**मोरोपंतः**——साहेब, आपल्याकरतां—आपल्याकरतां मी हें कबूल करतों पण जर दरबारांत आमचा अपमान झाला तर पुढच्या परिणामाला मी मुळींच जबाबदार नाहीं. आमच्याकडून प्रथम कांहींच होणार नाहीं एव्हढं मी आपणांस वचन देतों. साहेब, आपल्या आजपर्यंतच्या प्रेमळ वर्तनाकडं दृष्टी गेली कीं हृदय कसं भरून येतें नी पुढच्या भयंकर मार्गांत पाऊल टाकतांना आपली तेजस्वी मूर्ती डोळ्यापुढं सारखी उभी रहाते. पण काय करूं ! नाइलाज—नाइलाज होतो. ( जातो )

**एलिसः**—नाइलाज ! नाइलाज !

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळ**—झांशी. दरबार. सरदार मानकरी चिंतातूर आहेत. रामचंद्रराव मुख्यासनाजवळ. ]

**रामचंद्रः**—बोला सरदार हो, आजच्या मंगलदिवशीं राष्ट्रदेवीच्या नांवाचा इतक्या उच्च स्वरांत जयजयकार करा कीं, सप्तपाताळांत दडून बसलेले आपले शत्रू, आपल्या या आनंदगर्जनेनं खडबडून जागे होतील ! बोला, महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो.

**सर्वः**—महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो !

( हेस्टी आणि एलिस प्रवेश करतात. )

**हेस्टीः**—( रागानें ) लछीमी बाईका जयजयकार ?: आमच्या राज्यांत आमच्या जयजयकाराविगर दुसऱ्या कुनाचाबी जयजयकार करन्याची

म्हटलं ! साहेब साऱ्यांच इंग्रजांचीं अंतःकरणं जर तुमच्यासारखीं असतीं तर आज हिंदू नीं इंग्रज बंधुभावनेनें नसते का वागले ?

**एलिसः**—Of course ! वागलेबी अशटे ! पन टशा होनं शक्य नाय ! मोरोपंत टुमच्या ढर्माच्या आड येऊं नाय अशा मला किती टरी वाटटो ! पन करणार काय ! झांशी या पुरंबी राजनिष्ट ऱ्हावी आशी माझी फॉर ईच्छा हाय !

**मोरोपंतः**—ती ठेवणं किंवा न ठेवणं आपल्या हातीं आहे !

**एलिसः**—या वक्तीं रानीशापचं मन आपन शावरलं पाहिजे !

**मोरोपंतः**—ज्याचं स्वतःचंच मन भडकून गेलं आहे, तो दुसऱ्याचं मन कसं सावरणार ? साहेब, लक्ष्मीचं मन सावरून–सावरण्यासारखं नाहीं. रोज झांशीवर चालून आले हे ऐकल्यापासून तिचं मस्तक फिरून गेलं आहे !

**एलिसः**—काय होनार ? God knows ( गॉड नोज. )

**मोरोपंतः**—होणार ! आमच्या प्रश्नाचा योग्य तो निकाल लागला नाहीं; आमच्या राजनिष्ठेचा योग्य तो मोबदला जर आम्हांला मिळाला नाहीं तर परिणाम ठरलेलाच आहे ! लक्षांत ठेवा. साहेब, आम्ही हिंदू स्वामीकरतां प्राण देऊं पण स्वामीकडून अपमान करून घेणार नाहीं. कालचक्राच्या गिरकीबरोबर भिरकावून दिलेल्या प्राण्यांना दुर्दैवानं, त्यांच्या सेव्य स्थितीऐवजीं सेवक बनावं लागतं पण त्यामुळं त्यांची मानसिक योग्यता, हृदयांत संचारणाऱ्या दैवी शक्ती कधींच लुप्त होत नाहींत. जित झाले म्हणून कांहीं मेलेले नसतात. जेत्यांना तेवढी अंतः-करणं नी जितांना अंतःकरणच नाहींत का ? बोला जितांना मान नाहीं का ? साहेब, तुमच्याकरतां स्वतःचे जीव देणाऱ्या जितांना अभिमान नाहीं का ?

**एलिसः**—अशा कशा व्हईल ? मोरूपंत टुमच्या शारक्या इचारी मानशाचा शूडां डोक्शा जर फिरून गेला टर मंग रावशाप नानाशापला डोश काय म्हून डेवा ? खराच-झांशीच्या बाबट अन्याय झाला हाय.

**मोरोपंतः**—वोरछाच्या राजाला दत्तकाचा हक्क तहनाम्यांत नसतांना त्याच्या पश्चात् तें संस्थान कायम रहातं ! दत्तकाची परवानगी त्या

संस्थानला देण्यांत येते. पण झांशीच्या तहनाम्यांत दत्तक घेण्याचा अधिकार स्पष्ट दिसत असून सुद्धां झाशी खालसा होते. हा न्याय का !

**एलिसः**––पन मोरुपंत माजी आपनास एक रिक्वेस्ट हाय ? आपन होईल टिटक करून रानीशाबाचं मन आवरून धरा ! आजच्या डरबारांत रोज शाबाच्या प्रटीनीडीला होईल टिटकी शांट उट्टरं––

**मोरोपंतः**––त्या प्रतिनिधीकडून अपमानाचा एक जरी शब्द आला तरीसुद्धां लक्ष्मीची तलवार आज बाहेर पडेल !

**एलिसः**––पन माजी आपनास रिक्वेस्ट हाय ना !

**मोरोपंतः**––साहेब, आपल्याकरतां–आपल्याकरतां मी हें कबूल करतों पण जर दरबारांत आमचा अपमान झाला तर पुढच्या परिणामाला मी मुळींच जबाबदार नाहीं. आमच्याकडून प्रथम कांहींच होणार नाहीं एव्हढं मी आपणांस वचन देतों. साहेब, आपल्या आजपर्यंतच्या प्रेमळ वर्तनाकडं दृष्टी गेली कीं हृदय कसं भरून येतें नी पुढच्या भयंकर मार्गांत पाऊल टाकतांना आपली तेजस्वी मूर्ती डोळ्यापुढं सारखी उभी रहाते. पण काय करूं ! नाइलाज–नाइलाज होतो. ( जातो )

**एलिसः**—नाइलाज ! नाइलाज !

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळ**—झांशी. दरबार. सरदार मानकरी चिंतातूर आहेत.
रामचंद्रराव मुख्यासनाजवळ. ]

**रामचंद्रः**—बोला सरदार हो, आजच्या मंगलदिवशीं राष्ट्रदेवीच्या नांवाचा इतक्या उच्च स्वरांत जयजयकार करा कीं, सप्तपाताळांत दडून बसलेले आपले शत्रू, आपल्या या आनंदगर्जनेनं खडबडून जागे होतील ! बोला, महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो.

**सर्वः**—महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो !

( हेस्टी आणि एलिस प्रवेश करतात. )

**हेस्टीः**—( रागानें ) लछीमी बाईका जयजयकार ?: आमच्या राज्यांत आमच्या जयजयकाराविगर दुसऱ्या कुनाचाबी जयजयकार करन्याची

सख्त मनाई हाय ! बंडखोर, चोर, लुटारू राजद्रोही–मर्डरर्स ! टूमाला मी इंग्रज सरकारचा एन्व्हाय म्हणून फर्मावतो कीं टुमी अबीके अब्बी या ठिकानीं, लछीमी बाईका जयजयकार करण्याबद्दल माफी मागून 'खुल्क खुदाका, मुल्क पातशाहका, अंमल अंग्रेज सरकारका !' अशा जय-जयकार केला पाजे ! बोलो ! सरकारका जय ! अंग्रेज सरकारका जयजयकार ( सर्वजण हंसतात. )

**एलिसः**—नो; मिस्टर हेस्टी इट्स् अगेन्स्ट देयर यूज्वल प्रॅक्टिस !

**हेस्टीः**—टुमीबी टेंची टरफडारी करटे ? मी आज जनरलचा जोरा-वर आशं फर्मावटे है !– बोला–खुल्क खुदाका, मुल्क पादशाहका, अंमल अंग्रेज सरकारका !

**रामचंद्रः**—आपण परकी वकील या नात्यानं आपल्या जागेवर आधीं बसा नी महाराणीसाहिब येतांच त्यांच्याजवळ काय बोलायचं असेल तें बोला. तोंपर्यंत सरदार मानकरी हो बोला–महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो !—

**सर्वः**—महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो !

**हेस्टीः**—( चिडून ) नहीं नहीं. अंग्रेज सरकारका जयजयकार !

**लक्ष्मीः**—( पडद्यामागून ) हं खबरदार ! ( सर्वजण उभे रहातात. हेस्टी बसतो व ओरडतो अंग्रेज सरकारका जयजयकार. महाराणीच्या वेशांत लक्ष्मी, मागून मोरोपंत, सुंदर, कामिनी येतात.) खबरदार त्यांचा जयजयकार कराल तर ! या झांशींत या शिवराय मामंजींच्या झांशींत, या लक्ष्मीच्या झांशींत या लक्ष्मीचाच जयजयकार झाला पाहिजे.

**सर्वः**—महाराणी लक्ष्मीचा जयजयकार असो !

**हेस्टीः**—Insult !–अपमान, अपमान.

**लक्ष्मीः**—अपमान, अपमान म्हणून टाहो फोडणारांनीं, दुसऱ्यांच्या मानापमानाकडं विशेष लक्ष दिलं पाहिजे ! आपण इंग्रजांचे वकील, आपण त्यांच्या सेनानींचे मदतनीस. त्यांच्या दरबारांतून वावरलेले ! आपल्याला दरबारी शिरस्ता माहीत असावयास पाहिजे होता. दरबारी जयजयकारावर हुकमत चालवण्याचा तुम्हाला काय अधिकार ? शिवाय दरबारच्या बरोबर तुम्ही या लक्ष्मीला खडी ताजीम द्यायला हवी होती.

हेस्टीः––कोण टूमी ! टूमी आमचे प्रतिनिडी !

लक्ष्मीः––म्हणजे तुमच्या मध्यवर्ती सत्तेच्या ठिकाणीं होते. तुम्ही माझा प्रत्यक्ष उपमर्द करून, आपल्या सम्राज्ञीचा विक्टुरिया राणीचा अप्रत्यक्ष रितीनं अपमान केला आहे.

हेस्टीः––आमी टूमाला मारानी समजटच नाय ! टूमी एक बंडखोर––

लक्ष्मीः––होय; अन्यायाविरुद्ध हें बंडच आहे. बोला, काय तुमच्या सेनापतीच म्हणणं आहे ?

हेस्टीः––टूमी जाटीनं मोरोपंटाबरोबर टुमचे पहिले आठ शरडार घेऊन, हत्याराबिगर आमच्या जनरल शापना भेटलं पाजे !–

मोरोपंतः––काय निःशस्त्र येऊन भेटलं पाहिजे ?

हेस्टीः––हो–हो भेटलंच पाजे. ना टर–

मोरोपंतः––नाहींतर ! नाहींतर काय होणार ? नाहींतर कोणते भयंकर परिणाम या झांशीला भोगावे लागणार ? धमकी देऊन जरब बसविण्याची वेळ गेली हें पूर्ण समजून रहा ! आजच्या झांशीचें तेज, पूर्वीच्या झांशीच्या तेजाहून फार निराळं आहे ? आजच्या झांशीच्या प्रत्येक जिवंत प्राण्यांत स्वाभिमानाची, देशाभिमानाची ज्योत सारखी धगधगत असलेली तुम्हाला दिसेल. समजलात ? नाहींतर–काय होणार ?

हेस्टीः––नाय टर रणांगनावर आमच्याशीं झुंजायला तयार व्हा.

लक्ष्मीः––झुंजायला तयार व्हा ! आज ही झांशी आपल्या आत्मतेजावर रणांगणांत तुमच्याशीं झुंजायलासुद्धां तयार आहे–समजलात. तुमच्याकरतां ज्या झाशीनं तुमच्या शत्रूला, आपल्या प्रजेचीं मस्तकं तुडवीत तुमच्याकडे येऊं दिलं असतं, त्याच झांशीच्या प्रजेचीं मस्तकं तुटून पडल्याशिवाय झांशींत तुमचा प्रवेश होणार नाहीं. लक्षांत ठेवा, साहेब आजपर्यंत आमचे हिंदुस्तानचे पुरुषच तुमच्याशीं लढले असतील, पण आज एक स्त्री आपल्या आत्मविश्वासावर तुमच्याशीं लढायला तयार आहे !

हेस्टीः––टेला जाळून पोळून टाकनं आमालाबी शक्य हाय यें टूमीबी ध्येनांत ठेवा.

एलिसः––रानीशाप––

हेस्टीः––रानीशाप–कोन रानीशाप ! बंडखोर—

लक्ष्मीः––साहेब आपण वकील या नात्यानं इथं आला आहांत हें विसरूं नका ! वकीलाची मर्यादा सोडून यापुढं आपला एक शब्दही आला तर प्रसंग फार निराळा होईल. बोला साहेब–

हेस्टीः—रानीशाप आपन जरा शांट–

लक्ष्मीः––शांत ? आतां शांत कशी राहूं ? माझी झांशी अन्यायानं खालसा केली, त्यावेळीं माझ्या हक्काकडं दुर्लक्ष करून मी शांत राहिलें. आपल्या समक्ष घेतलेला दत्तक नामंजूर केला तरी मी शांत राहिलें ! तुम्ही टाकलेल्या भाकरीच्या तुकड्यावर कुत्र्याप्रमाणं मी सतुंष्ट झालें नी उलट माझ्या देशबधूंवरच थुंकून तुमच्या बायकांपोरांचं याच–याच बंडांत रक्षण केलं ! राजनिष्ठेचं मीं कर्तव्य केलं ! तुमच्या नरडीचा घोट घ्यायला निघालेल्या नथेखानाचा गळा परस्पर दाबून आम्हीं आमच्या राजनिष्ठेवर कळस चढविला. त्याचा मोबदला काय ? तर झांशी बंडखोर. साहेब, सांगा मी शांत कशी राहूं ? तुमच्या प्रत्येक कृत्यानं या लक्ष्मीच्या हृदयाच्या चिंध्या चिरफळ्या उडाल्या. कृतज्ञतेच्या ऐवजीं कृतघ्नता तिच्या वाट्याला देऊन तिच्या सर्वांगाची लाही लाही उडविलीत; तरी तिनं शांत रहावं कीं काय ? 'लक्ष्मी' या झांशीचें वैभव, पूर्वजांचं नांव, स्वतःचा धर्म, स्वतःचे हक्क पालन करण्याकरतां जगांतील कोणत्याही असुरी सत्तेशीं झुंजायला तूं मागं पुढं पाहूं नको.' ही माझ्या पतीची शेवटची आज्ञा माझ्या कानांत कशी सारखी घुमत आहे ! नथेखानाच्या तलवारीला बळी पडून आमच्या राजनिष्ठेच्या मंदिरावर अभिमानानं लटकत असणारी आमच्या रणगाजींचीं मस्तकं, यावेळीं हंसून माझा उपहास करीत आहेत–सांगा. साहेब, मी शांत कशी राहूं ?

एलिसः––रनांगनावर आमच्या सैन्याशीं––

मोरोपंतः––साहेब एकदां रणांगणावर पाऊल टाकल्यावर जयापजयाची काळजी कोण करतो. झांशीच्या ललाटीं पूर्ण सत्यनाशच असेल तर झांशीच्या साऱ्या प्रजेचीं मस्तकं समरभूमीवर पसरलीं जातील, पण त्या हुतात्म्यांना स्वाभिमानाचं समाधान, स्वर्गांत खात्रीनं मिळेल !

हेस्टीः– Shut up ! बस्स ! बस्स, झालं हें राजद्रोही भासन. बोलो ए बंडखोर टूझं उट्टर सांग.

लक्ष्मीः—जा, जा. या लक्ष्मीचा या बंडखोर लक्ष्मीचा तुझ्या सेनापतीला असा निरोप कळव कीं, झांशीतलं एकहि मनुष्य निःशस्त्र म्हणून तुमच्या भेटीला येणार नाहीं. उलट आल्या वाटेनं—

हेस्टीः—टशं सांगन्याच्या आडीकार टुजा नाय.

लक्ष्मीः—काय ! या लक्ष्मीला हा अधिकार नाहीं ? या झांशीच्या महाराणी लक्ष्मीला हा अधिकार नाहीं ? पहा-पति-देवा-पहा झांशीच्या भरदरबारांत तुमच्या लक्ष्मीचा होणारा हा अपमान पहा; नी यावेळीं तेजस्वी करारीपणा या लक्ष्मीला द्या. मामंजी ' सदाशीराव भाऊंची सून लक्ष्मी खरी ' असा धन्यवाद साऱ्या जगाकडून घेण्याकरतां प्रलयकालचा कडकपणा आपल्या सुनेंत या वेळीं संचारू द्या ! बोला साहेब, अजूनही या लक्ष्मीनं शांतच रहावं काय ?

एलिसः—रानीशाप आपल्या परिस्थितीचा ईचार—

लक्ष्मीः—त्याचबरोबर तुम्ही आपल्या परिस्थितीचा विचार नको का करायला ? साहेब, ज्या हिंदूमुसलमानांनीं आजपर्यंत एकमेकांशीं झुंजतां झुंजतां रक्ताचे पूर वहायला लावले नी अरबी समुद्राला शोणीताचा साज चढवला–तेच हिंदूमुसलमान आज एकमेकांकरतां आपल्या रक्ताचे खळाळ वाटेल तेव्हां नी वाटेल त्या ठिकाणीं तोडायला आनंदानें तयार आहेत.

हेस्टीः—Mutiny ! बस्स बंड ! बोलो उट्टर बोलो !—

लक्ष्मीः—जा तुमच्या सेनापतीला आमचं हें उत्तर कळवा. ( तरवार हेस्टीपुढें फेकते. ) झांशीचीं हाडं नी हाडं चिंबून निघेपर्यंत तुमच्याशीं ती सामना द्यायला तयार आहे.

हेस्टीः—टुमी आमचे कैदी हाट—

लक्ष्मीः—स्वतंत्र झालेल्या आत्म्याला कैदखाना माहीत नसतो. जा अर्ध्या घटकेच्या आंत झांशीबाहेर चालते व्हा. नाहींतर लष्करी नियमाप्रमाणं ' शत्रू ' म्हणून तुम्हांला कैद केलं जाईल. जा बाबा यांना सुखरूप नेऊन पोंचवा. झांशीकरांना शंकर किल्ल्यांत जाण्यास हुकूम सोडा. रामचंद्रराव, ( जाऊं लागतो.)

एलिसः—रानीशाप.
लक्ष्मीः—नाईलाज आहे साहेब. ( जाऊं लागते. )
हेस्टीः—खबरडार पूरं जाल टर.
लक्ष्मीः—काय करणार ? पुढं गेले तर काय करणार ?
हेस्टीः—( तलवार उपसून ) वंडखोर.

[ एलिसमध्यें येतो. सर्वजण तलवारी उपसतात. लक्ष्मी त्याच्यावर पिस्तूल रोखते. ]

मोरोपंतः—हं खबरदार.
रावसाहेबः—( दुसरीकडून प्रवेशून तलवार उपसतो.) हं खबरदार !
हेस्टीः—My God ( तलवार टाकतो. )

— अंक दुसरा समाप्त —



लक्ष्मी :—हां—खबरदार !

[ पान ४०

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ स्थळ–झांशी. शंकर किल्ल्याची एक बाजू. सुंदर सुंदरलालला ओढीत प्रवेश करते. मागें कामिनी तलवार घेऊन येते. ]

**सुंदरः**––अग अग हें काय ? बायकोचा नवरा म्हणजे तिचा विश्वासू कुत्रा असं कां तुला वाटतं ? कुत्र्याप्रमाणं मला फरफटत ओढीत नेतेस म्हणजे ? कांहीं शरम–

**सुंदरः**––एक शब्द अधिक बोलूं द्यायची नाहीं ! ‘ सांगशील त्याप्रमाणं वागेन ’ असं तुम्ही नी या तुमच्या मंजूळ साळुंखीनं कबूल केलें आहे.

**सुंदरः**––अग पण त्यावेळीं आमच्या दोघांच्याही जीवावर बेतलं होतं. जीव वांचवण्याकरतां वाटेल तें कपट करावं असं राजकारण आहे.

**कामिनीः**––अहो पण देवीची शपथ दिली आहे ना तिला ? शपथ मोडली म्हणजे देवीचा राग तर नाहीं ना होणार !

**सुंदरः**––अग राजकारणांत देवाला मज्जाव आहे !

**कामिनीः**––पण बाई–

**सुंदरः**––बाई–आपला पण शेवटास जाईपर्यंत तुझे सारे पण बाजूला ठेवीनास !

**सुंदरः**––काय हो कसलं हितगुज चाललंय ? एकाद्या राजकारणांतला घोटाळा तर नाहीं ना ? पण संभाळा हो नाहीं तर ही प्रेमांतली अक्कल बोकाळतां बोकाळतां राजकारणाच्या अकलेशीं जुळेल नी तुम्ही बेअक्कल व्हाल !

**सुंदरः**––हं खबरदार ! बे अकली बेफाटपणानं बडबडणाऱ्या–

कामिनीः—अहो, अहो रागावूं नका तिच्यावर ! ती मेली रागावली म्हणजे पिडा होईल ना ?

सुंदरः—काय हो, सांगेन त्याप्रमाणें वागणार कीं नाहीं ?

कामिनीः—म्हणा ' हो ' म्हणून ! अहो म्हणा कीं ' हो ' म्हणून ! बाई सुंदर तुझ्या सांगण्याप्रमाणें मी वागायला तयार आहे. पण अशी भेडसावूं नकोस आम्हांला !

सुंदरः—अग अशी भितेस काय ? आजपर्यंत भीत आलों तेवढं पुरे कीं, हातांत आज काय आहे पाहिलंस ना ? ( सुंदरकडे वळून ) काय गं ए, तुझ्या शब्दाप्रमाणं वागायला मी कां तुझी बायको आहे कां ?

कामिनीः—अरे देवा, हे तर रागावले सुद्धां ! आतां काय होणार ? देवी—आई भवानी संभाळ गं बाई आम्हांला !

सुंदरः—हं. तोंड संभाळा ! माझ्या तोंडाला तोंड देऊं नका !

सुंदरः—तुझ्या तोंडाला मी तोंड देऊं नको ? मग काय सारा गांव कां देणार तुझ्या तोंडाला तोंड ?

सुंदरः—लढाईचे हात शिकायला तयार आहांत कीं नाहीं !

सुंदरः—अगं तुझ्यासारख्या बायकोकडून काय शिकायचे आहेत लढाईचे हात ? तुला लढाईची घमेंड असेल तर होऊं दे तुझे माझे चार हात !

सुंदरः—अस्सं कां ? या–रणधीर– या तर असे ! हं कामिनी, काल शिकविलेले हात तूं त्या बाजूनं सुरू कर. मी इकडून चाल करते ! मध्यें हे वीर शिरोमणी आहेतच ! हं करा म्हटलं सुरू !

[ दोघी पवित्र्यांत उभ्या राहतात ].

सुंदरः—अरे यांनीं तर माझ्यावर हल्ला करण्याचा विचार केला ! यांच्या या कोल्हेकुईंत माझी हाडं तरी शिल्लक रहाणार कां ? एकजण दुसरीचा राग होऊं नये म्हणून हळूंच प्रेमानं लचका काढणार तर दुसरी प्रेमाचा बोजवारा झाला म्हणून हाडूक उपसणार ! देवारे देवा.

सुंदरः—हं सुरवात करा—

सुंदरः—कुठून ही बायकांची साडेसाती माझ्या मागं लागली कोण जाणं ! अगं ए, दुसरं काय वाटेल तें सांग; पण लढाईचें राहूं दे सध्यां.



**सुंदर :**—अरे अरे ! माझा रेंदा पाडायचा विचार केलात ! [ पान ४३

एक महिनाभर डोळे झांकून अंधळी कोशिंबीर खेळायला सांग; खेळतो, दररोज पांचशें उठबशा नि हजार जोर काढायला सांग–काढतो ! पण–

सुंदरः—तें कांहीं नाहीं. माझ्याकरतां नाहीं; पण तुमच्या स्वतःच्या जिवाकरतां तरी लढायला शिका. हं कामिनी कर सुरवात–

सुंदरः—आतां तर ही अगदीं हातघाईवर आली कीं, या दोन्हीकडून अंगावर आल्या कीं, मधून एकदम निसटतो. मग एकमेकांच्या अंगांवर धडकून, यांच्या चिंध्या होऊन मेल्या तरी हरकत नाहीं ! हं चल एकदां ! तुझी घमेंड उतरवायला हा वीर तयार आहे. कामिनी, तूं थोडा माझ्यावर नाजूक हल्ला कर, म्हणजे दाखवतो माझा पराक्रम.

कामिनीः—माझी काळजी करूं नका. तुम्ही तिला संभाळा म्हणजे झालं ( दोघीकडून सुंदरलालवर हल्ला होतो. तो मध्यें तलवार फिरवीत ओरडतो व घाबरून दूर जातो. )

सुंदरः—अरे अरे अरे ! माझा रेंदा पाडायचा विचार केलांत कीं काय ? ( बाजूंस ) हिच्या तावडींतून सुटायला कांहीं तरी युक्तीच केली पाहिजे. ( उघड ) लाडके सुंदर, असल्या लढण्यानं रंग नाहीं येत ! ही लढाई कांहीं अटीवर झाली पाहिजे.

सुंदरः—असं कां ? वा फारच छान !

कामिनीः—अहो आतां कसली आणखी अट घालतां ? आतांपर्यंत थोड्या कां अटी आपल्या मागं लागल्या आहेत ?

सुंदरः—( कामिनीस हळूंच ) तूं मुळींच भिऊं नकोस ! माझ्या युक्तीनं आपण दोघेही आतां गप्पा मारायला मोकळे होऊं. ( उघड ) सुंदर आपल्या तिघांपैकीं एक कोणी तरी जमिनदोस्त होईपर्यंत ही लढाई चालावी.

कामिनीः—अगबाई ! मी नाहीं तुमच्याशीं लग्न झाल्याशिवाय जमिनदोस्त व्हावयाची.

सुंदरः—सुंदर बोल आहेस या अटीवर युद्धाला तयार ?

सुंदरः—हो हो माझी सुद्धां हीच इच्छा आहे ! कसे तरी एकदां तलवार फिरवायला शिकून या कठ्ठ काळांत आपला जीव वांचवा म्हणजे झालं !

सुंदरः—तुझ्या तडाक्यांतून ज्यावेळीं वांचेन, त्यावेळीं कड्ड काळाला बळी पडावयाची भीति. वरं चल ठीक आहे !

कामिनीः—अहो ठीक काय ? ही कावेबाज आहे ! तुम्हाला ती खरोखरीच मारील ! सुंदर ते नाहींत तुझ्याशीं या अटीवर लढत !

सुंदरः—कामिनी, मी या अटीवर हिच्याशीं सामना द्यायला तयार आहे. चल सुंदर सलामी दे—

कामिनीः—आतां काय करूं !

सुंदरः—अगदीं स्वस्थ रहा ! हर हर महादेव !

[ लढूं लागतो व मधून मधून "हरहर महादेव" असा ओरडा करतो. शेवटीं जमिनीवर लोळण घेतो. ]

सुंदरः—अहो हें काय ! असे लोळतां काय !

कामिनीः—[ घाबरून ] अगबाई, काय झालं ? [ सुंदरलाल जवळ बसतो ] मेले, घात केलास ग घात केलास ! नवऱ्याला मारलंस—नरकांत पडशील ! अहो सुंदरलाल—आतां मी लग्न कुणाशीं हो करूं ?

सुंदरः—अहो माझ्याशींच !

सुंदरः—अहो उठा—!

सुंदरः—मी जमीनदोस्त झालों आहे आतां ! लढाई बंद होत असेल तर उठतों !

कामिनीः—अरे देवा ! अहो तुम्ही मेल्यावर हो कसे उठणार ? तुमच्या पिशाच्याशीं कां मी लग्न लावूं ?—अग, कायग केलंस यांना ?

सुंदरः—ती काय करते मला ? तिची काय आहे थोबडी ! तिला मी या लढाईंत जिंकली आहे ! बोल, लढाई झाली बंद कीं नाहीं ?

कामिनीः—तिला जिंकलीत ! जिंकलीत हिला ? बरी मेलीची खोड मोडलीत ! मग तर तुम्ही आपले असेच पडून रहा हो !

सुंदरः—असंगाशीं संग नी प्राणाशीं गांठ !—मला फसवलंत काय ?—उठा लढाई बंद !

सुंदरः––[ एकदम उठून ] शाबास वीरांनो ! कामिनी, जयाचं निशाण उभार ! शरण आलेल्या शत्रूला सुंदर––

( आंत पहारा बदलल्याचा तास वाजतो. )

सुंदरः––अगबाई, पहारे बदलले ! मला तपासणीला गेलं पाहिजे––

सुंदरः––जावं–पराजीत झालेल्या अबले, तुझ्या तरवारीची खंडणी घेऊन तुला आम्ही सोडून देतों !

सुंदरः––याचा सूड घेईन बरं––( जाते ).

सुंदरः––कामिनी, जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं याची सत्यता आज पटली.

कामिनीः––ती कशी ?

सुंदरः––अग मी मेलों–नी त्या जित्या सुंदरची खोड मोडली ! पण तिला कायमची मारून टाकल्याशिवाय आपल्याला पूर्ण शांती मिळायची नाहीं ! हें पहा कामिनी, तिची चटणी आजच रात्रीं उडवायचा मीं बेत केला आहे. !

कामिनीः—ती कशी ! एकादा पापमार्ग तर नाहीं ना ?

सुंदरः––अग कारस्थानांत पाप मुळींच नसतं ! पूर्ण पवित्र जर जगांत कांहीं असेल तर तें कारस्थान ! हें पहा––आज मीं असा बेत केला आहे—कान कर इकडं,––दारूच्या कोठारावरचा पाहारा तपासायला ती आली कीं द्यायचा धूमधडाका उडवून ! धडाडधूम ! नी–देतो तुला एक पूड––; ती सुद्धां आजच रात्रीं झाडून साऱ्या टाक्यांतून तूं मिसळायचीस !––मग पाहूं–उद्यां आपले शत्रू कसे शिल्लक रहातात ते !

कामिनीः––पण वीष मिसळण्यांत पाप तर—

सुंदरः––अग तुझ्या हातून नी पाप ! पहाशील तूं आज रात्रीं ! सिंहद्वारावर तूं हजर रहा–; लढायचं असेल त्या झांशीकरांना राणीसाहेबांनीं किल्ल्यांत आज दवंडीनं बोलावलंच आहे ! आपला सत्पक्ष असेल तर तुला सिंहद्वारांतच दृष्टांत देईल देवी !—चला ! ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळः--झांशीजवळचें अरण्य :--रावसाहेब काळाबुरखा घेऊन प्रवेशतो. ]

**रावसाहेबः**—संकेताप्रमाणं सैन्य घेऊन—लक्ष्मीच्या मदतीला तर आलों ! आतां पुढचं यश परमेश्वरी इच्छेवर आहे ! किती भयाण हा अंधार ! कोणत्या महाराक्षसाची कृष्ण छाया या भूगोलावर प्रत्यहीं पडत असेल कोण जाणं !--या अफाट काळ्या दर्यांत किती तरी मोहक आशांच्या चांदण्या, तटातट तुटून पडत असतील नी कितीतरी मोहक आशांच्या मोत्याचे शिंपले जन्मास येत असतील ! वसुंधरेच्या आशानिराशांचीं मोजदाद करण्याकरतां सुटलेला हा वारा, चारीकडं खळबळाट उडवून देत आहे–तर स्वर्गीय मंगळालाहि लाजविणारे लाल गोळे सोडणाऱ्या या शंकरकिल्ल्याच्या तटबंदीवर टक्कर घेऊन, मस्तकाच्या चिंध्या उडाल्यामुळं, केविलवाणा घूत्कार करीत मागं फिरत आहे !--वायुराजा, लक्ष्मीच्या मंगलामंगलाची गणती तुला कशी करतां येणार ? हृदयाला आनंदानं नाचवणाऱ्या त्याचप्रमाणं मनाची माती करून आयुष्याचा अंत करणाऱ्या भविष्याचा उगम, वर्तमानकालांत--मनुष्याच्या डोळ्यादेखत त्याच्या पायाखालीं होत असतो, तरी देखील तो त्याचा त्याला समजत नाहीं, तर तुझ्यापुढं फिरत सुटलेल्या कालचक्रावरच्या प्राण्याच्या पळत्या पावलाखालीं काय आहे, हें तुझ्यासारख्या तिऱ्हाइताला काय समजणार ?

[ हेस्टी हिंदी सैनिकासह प्रवेश करतो व चोरकंदिलाचा उजेड रावसाहेबावर पडतो. ]

**हेस्टीः**--पकरो ! पकरो ! काफरकूं !

**रावसाहेबः**—हां–खबरदार !–कोण हेस्टी ?

**हेस्टीः**—कोण–रावशाप ! बंडखोर रावशाप ?

**रावसाहेबः**—होय तोच हा बंडखोर रावसाहेब--तुमचा दुष्मन हा रावसाहेब तुमच्यापुढं आहे !--आमच्या मानाकरतां—

**हेस्टीः**—मान–टुमाला कशला मान ? बंडखोर डरोडेखोर टूमी ! टूमाला कशला मान ?

रावसाहेबः—आम्हाला कसला मान? वीस वर्षांच्या तुमच्या शेंबड्या पोराला मान नी आम्हाला कसला मान?

हेस्टीः—चूप रहो—पकरो—अबीके अबी पकरो—

रावसाहेबः—काय मगदूर आहे तुमची! आघाताला प्रत्याघात मिळेल समजलांत?

हेस्टीः—पकरो—पकरो (हिंदी सैनिक पुढें होतात.)

रावसाहेबः—या—या तुमचे बाप जर हिंदु नसतील तर पुढं या नी या रावसाहेबाला कैद करा! तुमच्या आया जर हिंदूंच्या माता नसतील तर पुढं या नी माझ्यावर आपलीं शस्त्र चालवा! गुलाम व्हा! आपल्या मायबहिणींची विटंबना करण्याकरतां धांवत सुटा! नका—असें मागं सरूं नका! तुम्हां सर्वांच्या समशेरीला—सामना द्यायला ही एकटी रावसाहेबाची तरवार तयार आहे! उपसा—आपल्या तरवारी उपसा! तुमचा भाऊ, तुमच्या आयांचा हा मानलेला मुलगा—तुमच्यापुढं छाती ठोकून उभा आहे!

हेस्टीः—अरे—पकरो उस्कू!

सैनिकः—नाहि साप—आप पकरो—आप पकरो—

हेस्टीः—Really the heads of these Indian rascals must be knocked down!

रावसाहेबः—पहा साहेब, काल किती विचित्र आला आहे! तुमचे स्वतःचे लोक तुमचा हुकूम पाळीतनासे झाले—एवढेंच नव्हे तर हेच माझे गुलाम झालेले देशबांधव, माझ्या एका शब्दाबरोबर, या साहेब-बहादुरानांच इथल्या इथं या क्षणाला कैद करतील समजलात! पण तुमच्यासारख्या घमेंडखोरांची रग, रणांगणावर जिरवण्याचं सामर्थ्य आमच्या मनगटांत असतांना, हा नादानपणाचा मार्ग मी कधींच स्वीकारणार नाहीं!—गुलाम झालेल्या माझ्या देशबंधूंनो, रणांगणावर दुर्दैवानं तुमच्याशीं, तुमच्या मातांच्या अब्रूकरतां, तुमच्या धर्माकरतां—दोन हात मला करावे लागतील! तुम्हांला जबरदस्तीनं माझ्या मार्गांतून दूर करावं लागेल पण माझ्यावर न रागावतां धीरानं माझ्याशीं लढायला तयार व्हा! (जाऊं लागतो).

हेस्टीः—खबरदार! आमचा Insult! टूमी कोनापूढं बोलटे?

**रावसाहेबः**——एका इंग्रज सरकारापुढं ! साहेब, विनाकारण रक्तपात व्हावा अशी माझी इच्छा नाहीं ! तुमची जर इच्छाच असेल तर तुमच्याशीं दोन हात करायला या क्षणीं मी तयार आहे ! सोडा—माझा रस्ता मला मोकळा करा ! आणि उजळ माथ्यानं युद्धाला उभे रहा ! जा—झांशीच्या महाराणी लक्ष्मीच्या मदतीला आलेल्या पेशव्यांच्या सैन्याला टक्कर द्यायला तयार व्हा ! जा——

**हेस्टीः**——अरे पकरो——

**रावसाहेबः**——" पकरो—पकरो " असं घसा कोरडा करून छाती फुटेपर्यंत ओरडलांत, अगदीं कल्पांतापर्यंत तरीसुद्धां आतां हे लोक माझ्यावर हात उचलणार नाहींत. साहेब, तुमच्या उज्वल कर्तृत्वशक्तीवर, तुमच्या अंगीं वास्तव्य करणाऱ्या साहसी गुणांवर कोणीही लुब्ध होईल. पण तुमच्या अन्यायाचे तुकडे करायला उपसलेल्या आमच्या समशेरी कधींच म्यान होणार नाहींत !

**हेस्टीः**——मग आमच्या टरी कशा मान होटील ? ( तरवार उपसतो.)

**रावसाहेबः**——त्या निमकहराम तलवारीशीं झुंजायला अशा उपसलेल्या आमच्या तलवारी तरी कशा मागं फिरतील ? ( तरवार काढतो.) आजपर्यंत जगाच्या पाठीवर नांदत असलेल्या मोठमोठ्या वीरांच्या तलवारी तुमच्या तेजस्वी तलवारींना बिचकल्या असतील ! तुमच्या पायदळीं स्वतःचीं मस्तकं लोळवण्यांत मोठमोठ्या रणझुंजारांना भूषण वाटत असेल; पण आत्माभिमानाच्या उसळीनं उपसली गेलेली समशेर, त्या जिवाचीं हाडं मोडून निखळून पडेपर्यंत सुटत नसते. चला व्हा दूर.

**हेस्टीः**——आटां डूर कशाला ? ( लढूं लागतो. रावसाहेब वार करून निघून जातो. ) खून—खून—अरे Murder !

**सैनिकः**——साप पळाला—साप पळाला.

**हेस्टीः**——Block-head ! सापकुठं पळाला ! दौरो, पकरो.

**एक शिपाईः**——साप हमारे देश—मावापके नामसे तुमारे साथ, मुकाबला करनेकु हम् जाता है ! [ सर्व सैनिक जातात. ]

**हेस्टीः**——अरे ये बी पलाले ? My God ! !

## प्रवेश तिसरा

[ स्थळ--शंकर किल्ला. सिंहद्वार--सिंहद्वाराजवळ तोफ, दार बंद असून उजवे हातचे बुरुजावर दुसरी तोफ दिसत असून लांबच्या बुरुजाचा भाग दिसत आहे. सिंहद्वारावर भगवा झेंडा.]

**कामिनीः**—सुंदरलाल म्हणाले कीं इथं सुद्धां दृष्टांत देईल देवी आपला सत्पक्ष असेल तर !-खरंच, जगदंबे, या इंग्रजांशीं सुरूं झालेल्या लढाईत माझी सवत-ती मेली सुंदर मारली जावो ! प्रेमामुळं माझा जीवतडफडूं लागला आहे ! त्या सुंदरलालनां त्या कैदासणीच्या तावडींतून सोडवलंस तर तुला चांदीचे डोळे करून वाहीन ! ( डोळे झाकते. )

**सुंदरः**—( तोफे आडून हळूच ) हे प्रियतमे-भक्तललामे, मीं तुझी भक्ति पाहून तुझ्यावर प्रसन्न झालें आहे ! वरं ब्रूहि ! वरं ब्रूही !

**कामिनीः**—अगबाई, ही आकाशवाणी कीं भूताटकी ? पळून जायचीसुद्धां सोय नाहीं !--कीं अंगांत त्राण नाहीं ! आतां काय करूं ?

**सुंदरः**—( गंभीरपणें ) वत्से, न भेतव्यम् ! न भेतव्यम् ! पळूं नकोस ! किंवा घाबरूं नकोस ! ही भुताटकी नाहीं-ही देववाणी आहे ! वरं ब्रूहि ! वरं ब्रूहि !

**कामिनीः**--किती मी भाग्यशाली ! लोक म्हणतात--कलीयुगांत मुळी देवच नाहीं ! पण माझ्याशीं तर देवी प्रत्यक्ष बोलते आहे ! पहा मेल्यांनो पाहिजे तर—

**सुंदरः**—वत्से, लक्ष्मी सुंदरसारखे पाखंडी आतां यायचा संभव आहे ! तस्मात् वरं ब्रूहि ! वरं ब्रूहि !

**कामिनीः**—पण गडे-खरंच कां ते पाखंडी आहेत !

**सुंदरः**—अग हो ! किती बोलशील ! म्हणूनच वर माग नी जाऊं दे मला !

**कामिनीः**—नको ग जाऊंस तू ! तूं अशीच बोलत रहा माझ्याशीं म्हणजे त्या मेल्यांना माझी देवभक्ति तरी कळेल !

**सुंदरः**——तसं मला करतां येणार नाहीं—तुझ्या भोळ्या स्वभावाची मला कींव येते !——बोल—काय पाहिजे ?

**कामिनीः**——मुंदरच्या त्रासानं ते मेले सुंदरलाल अगदीं वाळत चाललेत ! माझें त्यांच्यावर प्रेम आहे ग !

**सुंदरः**——समजला तुझा हेतू—! तुझी इच्छा लवकरच पूर्ण होईल ! पण मुंदरला जगांतून नाहींशी करण्यापूर्वीं तुझी परिक्षा घेतली पाहिजे ! तूं सुंदरलाल करतां काय करशील !

**कामिनीः**——वाटेल तें करायला सांग——

**सुंदरः**——तर मग त्या तोफेशीं टक्कर दे—

**कामिनीः**——ही पहा घेते——( धावत जाते— )

**सुंदरः**——शाबास वत्से—तुझी इच्छा पूर्ण होईल !—— ( ती टक्कर घेणार इतक्यांत तोफेआड्डन पुढें येतो )—अग—अग—अग—मरशील !

**कामिनीः**——अगबाई,—कोण सुंदरलाल ! तुम्ही कसें इथं ?

**सुंदरः**——अग हे शपथेच्या विड्यांचं तबक घेऊन इथं आलों तर तूं मरायच्या बेतांत दिसलीस !——तुझं माझ्यावरचं प्रेम पाहून मी अगदीं गारीगार झालों आहे !—आपले हेतु खात्रीनं पूर्ण होणारच—! बाईसाहेब झांशीकरांना किल्ल्यांत आणण्याकरतां—पायथ्याशीं गेल्यांत—! आज इंग्रजांचा जोराचा हल्ला होणारसं दिसतं !—त्या यायच्या आधीं आपलं काम झालं पाहिजे !

**कामिनीः**—सांग ! माझ्या लालाच्या पायीं मी जीव वाहिला आहे !

**सुंदरः**—तें मला माहीत कां नाहीं ? पण काम नाजूक आहे !—परवां सांगितलेलं—पूड पाण्यांत मिसळायचं ! राजकारण आहे—

**कामिनीः**—काय राजकारण ! मग——नको ग बाई ! सुळी सुद्धां जावं लागायचं !

**सुंदरः**—अग त्या मुंदरची नी त्या दांडगट राणीची खोड मोडायची आहे ना आपल्याला ? घे ही पूड ! ( पुडी देतो ) माझ्या त्या दोस्त साहेबांनीं दिलं आहे !——अशी खोड मोडेल बेट्यांची :——

**कामिनीः**——पण पूड पाण्यांत टाकतांना मला कुणी पाहिलं तर—सुंदर.

**सुंदरः**——तर मात्र आपली खोड मोडेल !—त्या पहा—बाईसाहेब

आल्या–मार्ग–साऱ्या झांशीकरांचा घोळका! आजचा रंग निराळा दिसतो–चल–पळ– (जातात.)

[ दरबारी वेषांत पुढें लक्ष्मी, मागे मोरोपंत व इतर सरदार नागरिक वगैरे. ]

लक्ष्मीः––बाबा, सरदार, झांशीकरहो!–इंग्रजांनीं वेढून टाकलें आहे आपल्याला. पण झांशीची समशेर, इभ्रत पणाला लावून, कर्तव्याकरतां बाहेर पडली आहे! आतां मात्र खऱ्या जबाबदारीचा प्रश्न आहे! इंग्रजांना शरण जाऊन ज्यांना झांशीबाहेर पडायचं असेल त्यांचा मार्ग मोकळा आहे; पण झांशीच्या दौलतीला बहाल केलेलीं आपलीं स्वामिनिष्ठ मस्तकं, तिची आबाद राखण्याकरतां, आपल्या तक्दिराला तुडवीत रणागणांवर ज्यांना उधळून द्यायचीं असतील––त्यांना शंकरकिल्ल्याचं सिंहद्वार खुलं आहे! बोला, झांशीच्या गादीचा हा निर्वाणीचा सवाल आहे! राष्ट्रदेवीच्या या नवरात्रांत, तिच्या सौभाग्याचा करंडा, आपल्या उसळत्या रक्ताचं कुंकूं करून भरायची ज्या रणमर्दांची हिंमत असेल त्यांनीं बेगुमान पुढं येऊन––या रणचंडिकेवरच्या तोफेवर हात मारावा नी मानाचा विडा उचलावा!

मोरोपंतः––(स्वगत) आहाहा! खरोखर, प्रतिरात्रीं आकाशांत चमकणारा नक्षत्रांचा नकाशा––म्हणजे जगांत माझ्या मनूप्रमाणं कर्तृत्ववान ठरणाऱ्या दिव्य आत्म्यांची नामसूची होय! (उघड) झांशीचा सरदार हा मोरोपंत तांबे, भवानीबरोबर माझ्या लाडक्या राणीला नी दौलतीला मुजरा करून आपलं मस्तक––या पणाला प्रथम लावीत आहे!

(विडा उचलतो.)

लक्ष्मीः––लक्षांत ठेवा कीं, प्रतिज्ञेचा उच्चार करण्याआधीं प्रत्येक मर्दाला आपल्या हातानं, आपल्या स्त्रीचं कुंकूं वाढवावं लागेल नी प्रत्येक सुवासिनीला आपलं मंगलसूत्र तोडावं लागेल!

सर्वः––याच अटीवर आम्ही हे विडे उचलतो!

(सर्वजण क्रमानें विडे उचलतात. नंतर सुंदर पुढें येऊन कुंकू वाढवते व मंगलसूत्र तोफेला वाहते. तिच्यामागून इतर स्त्रिया तसेंच करतात.)

लक्ष्मीः--शाबास माझ्या बहिणींनो ! भवानी तुम्हांला अखंड सौभाग्य देवो ! प्रजाजनहो ! झांशीचे हे निर्वाणीचे विडे माझ्या देखत सर्वांच्या तोंडीं रंगूंद्यात ! [ सर्वजण विडे खातात. ] प्रतिज्ञेची आठवण ठेवा नी मग तरवारीला हात घाला ! कारण हीं नागवेलीच्या नवतीची-नार रणरंगानं भरलेली आहे ! ती तुमच्या तरवारीच्या धारेचा जाब, नागीणीच्या तडफीनं तुम्हांला विचारील ! जा-बाबा-गोलंदाजाला इशारा द्या !- शत्रूचा मोर्चा नी मोर्चा बंद झाला पाहिजे ! [ सर्वजण जातात. ]

लक्ष्मीः--( तरवार काढून ) बाई विजये, प्रतिज्ञेप्रमाणं तुझ्या सौभाग्यापायीं, आज या झांशीतल्या साऱ्या वीरपत्न्यांच्या सौभाग्यावर मी पाणी सोडीत आहे ! साऱ्या सौभाग्यवतींच्या केशपाशांचं गंगावन करून जर तुझी माझ्या झांशीच्या या वैभवदेवतेची वेणी मला घालावी लागली, तरी त्यालाही मी आनंदानं तयार आहे ! "शीर कलम झालं तरी बेहेत्तर, पण शील कमी होऊं देणार नाहीं." या प्रतिज्ञेचा पुकारा माझ्या साऱ्या झांशीनं केला आहे ! या झांशीचा मान, झांशीचा धर्म-म्हणजेच झांशीचं शील ! नी विजये-हेंच तुझं सौभाग्य !—लाडके, या तुझ्या वैभवावरून जीव ओवाळून टाकायला तयार झालेल्या या रणझुंजार दासांचे राई राई एवढाले खंड पडतील, पण तुझं सौभाग्य अखंड राहील !—[ जाऊं लागते-इतक्यांत एक जासूद गडाखालून धांवत येतो. ]

जासूदः—सरकार-सरकार-घात झाला-पेशव्यांचा मोड झाला ! इंग्रजांची सरशी झाली ! मोर्चे झांशीवर लागले-

लक्ष्मीः--काय म्हणालास ! पेशव्यांचा मोड झाला ! इंग्रजांची सरशी झाली ?

जासूदः--होय सरकार--

लक्ष्मीः--निमकहराम ! लाज नाहीं वाटत असला निरोप सांगायला ? टाक, दे टाकून ती तरवार, नी या लक्ष्मीच्या हातांतल्या बांगड्या भर आपल्या हातांत ! झाशीनं पेशव्यांच्या बलावर आपली तरवार उपसली नाहीं !-तर आपल्या आत्मतेजावर विश्वास ठेवून तिनं ही रणकुंडांत उडी घेतली आहे ! समजलास ! झांशीनं रणांगणांत उडी, बंडांत सामील

होण्याकरतां घेतली नाहीं, तर या झांशीच्या राजनिष्ठेचा झालेला अपमान या झांशीवर झालेला अन्याय, यांचा सूड घेण्याकरतां–स्वतःच्या स्वातंत्र्या-करतां झांशीनं हा रणयज्ञ सुरू केला आहे ! जा, यत्किंचित् अंगांत तेज असेल तर आम्हा बायकांपेक्षां तरी नामर्द बनूं नका ! जा; तुमच्या आया-बहिणींच्या अब्रूची, तुमच्या स्वतःच्या बायकांच्या अब्रूची कांहीं चाड असेल तर शत्रूशीं शेवटपर्यंत झुंजत रहा !–जा–

( सेवक जातो. )

इंग्रजांचा विजय ! इंग्रजांचा विजय ! हतभागी आर्यदेवी, तुझ्या चारि-त्र्यपटावर कोणत्या कालाची ही रेषा उमटत आहे ! तुझ्या भाग्याची ही प्रभात, मध्यान्ह, सायंकाळ कीं मध्यरात्र !––अंधार–अंधार–देवा––देवा–अन्यायांचा विजय, राक्षसीवृत्तींचा विजय व्हावा अशाच तऱ्हेची गती आपल्या कालचक्राला दिलीस कां ?–( उदासपणें तोफेवर टेकते. )

**मोरोपंतः**––( प्रवेशून, ) मनू–पेशव्यांचा म्हणे मोड–हें काय ? मनू –तूं अशी उदास कां ? चार दिवसांपूर्वीं या तुझ्या तोंडावर खिदळणारा आनंदाचा गुलाब. आज असा सुकून कां गेला ? या तुझ्या डोळ्यांतल्या कोंदणांतल्या हिऱ्याऐवजीं हे लाल कुठून आले ? पूस–पूस ते डोळे. ! बेटा तुझा तेजस्वी स्वभाव असा मलूल कां ? सांग कोणत्या भयंकर संक-टानं ही आनंदचंद्रिका अशी भांबवून गेली ?

**लक्ष्मीः**––बाबा काय सांगूं ?

**मोरोपंतः**––मनु––लाडके, छबेली या युद्धांत उडी घेतल्यानं तुला त्रास कां होतो ? बोल ही तुझ्या बापाची छाती तुझ्या कोणत्याही दुःखाला झेलून धरायला तयार आहे !

**लक्ष्मीः**––होय बाबा, या मनूच्या कोणत्याहि दुःखाला आपली छाती झेलून धरील. तुमच्या छबेलीच्या रक्षणाकरतां बाबा–तुम्ही आपली मान वनराजाच्या जबड्यांत घाल–पण मी आज काय बोलूं ?

**मोरोपंतः**––हें काय बाळ ? सांग कोणत्या करणानें माझ्या या बाळाचे डोळे अश्रूंनीं डबडबले ? सांग पेशव्यांच्या पराजयानं––

**लक्ष्मीः**––पेशव्यांच्या मोडानं–स्वतःच्या मृत्यूनंही लक्ष्मीचं हृदय दडपून जाण्याइतकं बाबा तें आतां कमकुवत राहिलं नाहीं. ! बाबा

फत्तर फुटेल पण लक्ष्मीचें हृदय अभेद्यच राहील ! कोवळ्या बाळाच्या पोटांत कट्यार खुपसतांच, त्याच्या चिमकुल्या देहांतून उसळणाऱ्या रक्ताच्या लाल चिळकांडीकडं एकसारखी दृष्टी रोखून—त्याची केविलवाणी किंकाळी ऐकण्याचा कडवेपणा माझ्या देशाच्या स्थितीनं मला दिला आहे ! या लक्ष्मीचं रक्तानं रंगलेलं मस्तक माझ्या देशाच्या पायीं वहायला लक्ष्मी केव्हांही तयार आहे ! पण—बाबा—

**मोरोपंतः**—या तुझ्या मुग्धपणानं—तुझ्या या बापाच्या मनाला यातना होत आहेत छबेली ! सांग हें पाणी डोळ्यांत कां ?

**लक्ष्मीः**—बाबा, बाबा लक्ष्मी मेली. आपला अपजय झाला म्हणजे पुढं काय ? तुमच्या अपजयानं तुमचं हृदय फाटून नाहीं जात ? रणांगणावर तडफणाऱ्या जीवांच्या क्षणिक किंकाळया या आपल्या अपजयानं भारतवर्षांत अखंड चालू रहातील ! बोला आपल्या आतड्याला पीळ नाहीं पडत ? कुमारिकांचं कौमार्य, पतिव्रतांचं पातिव्रत्य दिवसा ढवळ्या मातीला मिळेल, त्या बाजार बसव्यांच्या ओळीला खेचल्या जातील. बोला, तुमच्याही डोळ्याला पाणी नाहीं कां येत ? त्यापेक्षां उद्याचा आत्मयज्ञ याच क्षणाला.

**मोरोपंतः**—अरेरे लक्ष्मी—बेटा नको नको ही विचारतंद्री ! मनू अगं तुझ्यासारखी रणदेवता, आपल्या तलवारीच्या जोरावर त्या अपयशांतून सुद्धां, दुबळ्या देशाला यशाचा मार्ग दाखवील. मनू तुझ्या मनांत उसळणाऱ्या या अविचाराच्या अस्पष्ट लाटेवर हिंदुस्तानचं सारं भवितव्य हेलकावत आहे याचा विचार कर ! या लाटेच्या धडाक्यानं भावी पिढी गुलामगिरीच्या रूक्ष वाळवंटांत खात्रीनं लोटली जाईल ! तुझा आनंदा—तें पोरकं पोर......

**आनंदाः**—आई, आई, आपला जय झाला होय ? आई.

**लक्ष्मीः**—आई, आई—अहाहा ! आई ! या लक्ष्मीला आई म्हणून हांक मारणारा माझा लाडका आनंद ? पतीच्या सुखाला मुकलेल्या, मातृपदाला कायमची आंचवलेल्या लक्ष्मीच्या हृदयांत मातृप्रेमाचा उमाळा आणणारा माझा राजहंस—आनंदा—( त्याला जवळ घेते. )

**मोरोपंतः**––होय मनू–तोच तोच तुझा आनंदा ! या जगांत उरलेला तुझ्या आनंदाचा ठेवा ! तुझा प्रेमाचं भांडार लक्ष्मी घे त्याला जवळ ! आपल्या हृदयाशीं असाच त्याला कुरवाळून घे. तुझ्या हृदयांत खेळत असलेल्या मातृप्रेमाच्या, समुद्राइतक्या तुफान लाटा उसळूं दे ! तुझ्या हृदयांत अपत्य प्रेमाच्या कारंजाचे तुषार इतके चौफेर उसळूं दे कीं–त्यांत झांशींतलेच नाहींत साऱ्या भरतखंडांतले प्रजाजन भिजून चिंब होतील ! नी प्रजारूपानं नटलेल्या त्या तुझ्या साऱ्या आनंदी–आनंदाच्या अंगावर आनंदाचे रोमांच थरारून, त्यांना अपत्यप्रेमाचा उमाळा येईल ! बेटा.

**लक्ष्मी**:—होय बाबा म्हणूनच मी माझ्या वात्सल्य प्रेमाच्या उमाळ्यानं माझ्या राज्ञीपणाच्या जबाबदारीनं सांगते कीं, माझ्या हजारो आनंदी आनंदांची गुलामगिरी टाळण्याकरतां ही लक्ष्मी केव्हांही आत्मयज्ञ करायला तयार आहे !

**मोरोपंतः**––आहे छबू–या मोरोपंताला तूं धन्य केलंस. तांब्यांचं घराणं आपल्या पतीच्या वंशाबरोबरच तूं उद्धरलंस ! पुत्र एकाच कुलाचा उद्धार करतो; पण कन्या दोन वंशांचा उद्धार करूं शकतात : मनू ये–या तुझ्या पित्याला एकदां कडकडून भेट. ( भेटतात. )

**लक्ष्मीः**––बाबा खऱ्या आर्यांची मान आपल्या शत्रूपुढं नमायच्या आधीं तुटून पडते.

( इतक्यांत आंत मोठा आवाज होऊन भडका उडतो. )

**मोरोपंतः**––हें काय ? आग ?––

**एक सैनिक** ( प्रवेशून ):––सरकार पलिकडच्या बुरजावरचा दारूगोळा पेटला ! दारूगोळा खलास झाला ! पाण्याच्या टाकींत कुणी दुष्टानं विष कालवलं ! फितुरी झाली––

**लक्ष्मीः**––हरामखोर ! दगलबाज. मस्तकांचे गोळे करून शत्रूवर फेका ! या लक्ष्मीचं मस्तक या धनगर्ज तोफेंतून शत्रूवर प्रथम डागा. ( जाऊं लागते. ) ( तटावरून एक तोफ चालू होते. ) कोण जालीमसिंग ?

**जालीमः**—हां जी हुजूर ! दुष्मनको मोर्चा अबी रोक देतां हूं.

लक्ष्मीः—हातची समशेर बहाल करीन.

( इतक्यांत एक गोळा येऊन जालीमचा हात उडतो. )

जालीमः—आह ! हुजूर हात निकल गया.

लक्ष्मीः—फिर सीर ?

जालीमः—सीर तो शाबूत है ! देखो–देखो तोसही–

[ एका हातानें गोळा सोडतो. इंग्रजांचा मोर्चा बंद पडतो. ]

लक्ष्मीः—शाबास मर्द ! लक्ष्मीचा मुकुट तुझ्या मस्तकावर शोभला असतां ! बाबा आधीं जालीमला पळवूं द्या. [ जातात. ]

[ सिंहद्वार लागतें. इतक्यांत पुढें मुंदर व मागें हेस्टी व त्याचें सैन्य धांवत येतात. ]

हेस्टीः—ओह् ब्यूटी ! औरट सारा औरट लडाऊं ? पलो रश ऑन !

मुंदरः—( उलटून ) आतां एक पाऊल पुढं टाकशील तर रक्ताचे पाट या ठिकाणीं वाहूं लागतील समजलास !

[ लढूं लागते. कांहीं वेळानें ' धांवाहो धांवा ' अशी मुदर हांक देते. ]

मोरोपंतः—( सिंहद्वारांतून येतो ) भिऊं नकोस ! मुंदर भिऊं नकोस. चल ये या मोरोपंताच्या तलवारीशीं सामना दे. [ लढतात. ]

हेस्टीः—ये टो शैटान ! ॲन ॲक्च्युअल मॉन्स्टर [ लढतो. ]

लक्ष्मीः—दूर व्हा एकदम दूर व्हा. या महाराणी लक्ष्मीच्या तलवारीचं तेज या बाजारबुणग्यांना समजूं द्या.

[ सर्वजण लढतात. ]

हेस्टीः—My god ! ये खूप शुरट औरट बिजली टो नहीं ? भागो दौरो. [ पळून जातात. लक्ष्मी बेफाम होऊन त्यांचा पाठलाग करूं लागते. मोरोपंत तिला आंवरतो. ]

लक्ष्मीः—सोडा बाबा सोडा मला ! शत्रूशीं मरेपर्यंत झुंजायची या लक्ष्मीची इच्छा पुरी होऊं द्या. आज या लक्ष्मीच्या रक्ताचे पाट माझ्या झांशींतल्या गरीब दुबळ्यांच्या रक्तांत मिळून गेल्याशिवाय माझ्या आत्म्याला शांती मिळणार नाहीं ! सोडा मला––



**लक्ष्मी :**—या लक्ष्मीच्या तरवारीचं तेज या बाजारबुणग्यांना समजूं द्या ! [ पान ५६

**सुंदरः**—बाईसाहेब शांत व्हा ! सारे इंग्रज झांशींत धुमाकूळ घालीत आहेत. पुढें जाण्यांत निभाव नाहीं. बाईसाहेब !

**मोरोपंतः**—बाळ अविचार करूं नकोस !

**लक्ष्मीः**—अविचार ! बाबा आतां जर ही लक्ष्मी मेली नाहीं तर या लक्ष्मीनं महाराणीचा मुकूट आपल्याला राजवैभवांत लोळायला मिळावं म्हणून आपल्या मस्तकावर ठेवला; प्रजेच्या दुःखाची वाटेकरीण होण्याकरतां ठेवला नाहीं असं सारं जग म्हणेल ! ऐका ! बाबा ऐका—या आरोळ्या ? माझ्या दीन दुबळ्या प्रजेच्या या आरोळ्या आंतड्यांना पिळून टाकीत आहेत. ते पहा बाबा—ते पहा हलवाईपुऱ्याच्या आगींत माझ्या झांशीचं स्वातंत्र्यवैभव कसं जळून खाक होत आहे ? या हृदयाला लागलेली आग—बाबा माझ्या वैऱ्यांच्या रक्तानं मला विझवूं द्या. चला, बाबा वीरांना साजेल अशा रीतीनें आतां मला मरूं द्या.

**मोरोपंतः**—( तिच्या आड येऊन ) मनू प्रसंग लक्षांत घे ! स्वीकारलेल्या कार्यांत मृत्यू नी निराशा खात्रीनं दिसत असतांना मनू हा अविचार तूं करणार ? मनू जीव वांचव—जीव वांचव नी देशालाही वांचव. बाळ परमेश्वर अजून आपल्याला मदत करील. मनू—नको नको हा आत्मघात करूं.

**लक्ष्मीः**—आत्मघात ! आत्मघात ! नाहीं बाबा हा आत्मघात नाहीं; तर हा आत्मोद्धार आहे. या रणयज्ञांत जीवाची आहुति दिल्यानं माझ्या देहाचं सोनं होईल. जिवाचं मोल होईल. सोडा मला. माझ्या मार्गांत येऊं नका.

**सुंदरः**—बाईसाहेब या सुंदरला—आपल्या प्रजेपैकीं एकीला तुडवून पुढं जा. ( तिचे पाय धरते. )

**लक्ष्मीः**—मृत्युमुखांत सांपडलेल्या माझ्या हजारो प्रजाजनांना सोडविण्याकरतां ही लक्ष्मी या एका सुंदरला लाथेनं अशी दूर सारायला कधींच मागं पुढं पहाणार नाहीं. ( लाथ मारते ) खबरदार कुणी मला अडथळा कराल तर ! ( जाऊं लागते. मोरोपंत तिचे पाय धरतात. )

**मोरोपंतः**—मनू पितृत्वाचा अभिमान सोडून हा मोरोपंत तुझे पाय धरीत आहे. लक्ष्मी शांत हो, शांत हो—नी हा वेडा विचार सोडून दे.

लक्ष्मीः––जें उत्तर सुंदरला तेंच उत्तर माझ्या जन्मदात्या पित्याला ! काय नाहीं जाऊं देत ? हें भेकडपणाचं वर्तन या लक्ष्मीच्या बापाकडूनच होत आहे का ? कवडीकिंमतीच्या प्राणांच्या आशेनं तडफडणाऱ्या हजारो निराश्रीत प्राण्यांकडं दुर्लक्ष करणाऱ्या या माझ्या बापाला–बापच म्हणूं कां ? जा बाबा तुम्हाला तुमच्या कवडीकिंमतीच्या प्राणांची पर्वा वाटत असेल तर खुशाल जा. प्राण वांचवा–साऱ्या जगाकडून धिक्कारून घ्या ! माझ्या प्रजेवरून ही लक्ष्मी हा एकच प्राण काय पण शेंकडों जन्मींचे प्राण उधळून द्यायला तयार आहे ! जा––

मोरोपंतः––या कवडीकिंमतीच्या प्राणाकरतां ! अरेरे चालव चालव आपली समशेर या निमकहराम मोरोपंतांवर तुझ्या बापावर ! त्याचा प्राण घे. त्याच्या रक्तांत न्हाऊन नीघ. पण बाळे अविचारी पोरी–स्वतःचे प्राण अविचाराचे भरांत गमावूं नकोस ! लक्ष्मी अग ही टीचभर झांशी म्हणजे तुझा देश नव्हे ! आज हिंदूंच तुझ्या तलवारीकडं आशाळभूत-पणानं पहात नाहींत; तर प्रत्येक हिंदी–स्वतःला हिंदुस्तानचा रहिवासी म्हणवून घेणारा–प्रत्येक हिंदू मुसलमान तुझ्या तरवारीकडं आशेनं पहात आहे. लक्ष्मी चालव–आपली तलवार या हृदयावर चालव ! त्यांतून उड-णाऱ्या भडक कारंजांत चिंब हो नी मग पुढं पाऊल टाक. या टीचभर झांशीला वांचविण्याकरतां पितृवध करून साऱ्या देशाच्या आशेचा खून पाड––

आनंदः––( धांवत येऊन ) आई, आई मला टाकून जाणार ? आई !

लक्ष्मीः––आई ! देवा किती भयंकर आघात या हृदयावर केलात ? आई–आई–नको बाळ नको ! तो शब्द पुन्हां ऐकवूं नकोस ! ( तलवार फेकून देते ) तुझ्या आई या शब्दाबरोबर माझ्या हृदयाच्या चिंध्या झाल्या ! काय करूं ? सारं ब्रह्मांड माझ्या आनंदाच्या सुरानं मला ‘ आई आई ’ अशा केविलवाण्या हांका मारीत आहे !

मोरोपंतः––मनू चालव चालव ती आपली अविचारी तलवार–आधीं तुझ्या आप्तेष्टावर चालव नी मग पुढं जा. ज्या आनंदाला ‘ माझा आनंदा, माझा आनंदा ’ म्हणून त्याचं कोडकौतुक केलंस त्याला या जगांतून नाहींसा कर नी मग त्या आगींत उडी घे. !

**आनंदः**—आई आई आधीं मला मार. आई–

**लक्ष्मीः**—आई आई ! नको बाळ. एक शब्द सुद्धां आतां या तुझ्या आईला ऐकवूं नकोस ! शत्रूच्या गोळ्यांनीं न मरणारी ही लक्ष्मी बाळ तुझ्या 'आई' या शब्दानंच मेली ! ठार झाली ! शत्रूच्या संगी-नीच्या टोकांना, त्यांच्या तरवारीला बोथट करून मागं रेटणारी या लक्ष्मीची छाती एका 'आई' या शब्दानं फुटून गेली. तुझ्या हृदयावर मस्तक ठेवून, भविष्याकडं डोळे लावून बसणारी तुझी मानलेली माता, आज तुझ्या शब्दानं रे मेली—झांशी–झांशी ! या लक्ष्मीला वाटेल ते शाप दे; पण या माझ्या लाडक्या लडिवाळाला सोडून द्यायचं सामर्थ्य या लक्ष्मींत नाहीं ! आनंदा आनंदा ( बेशुद्ध होते. मोरोपंत वगैरे तिला सांवरून धरतात. सुंदर वारा घालते. आनंद घाबरून उभा रहातो. )

— अंक तिसरा समाप्त —

# अंक चवथा

## प्रवेश पहिला

( स्थळ—काल्पी. एक राई. रावसाहेब प्रवेश करतो. )

**रावसाहेबः**—अरेरे, झाशी काय तुझी स्थिती झाली असेल ? लक्ष्मी या रावसाहेबाच्या पराजयाची बातमी ऐकतांच, तुझ्या हृदयाला आगींत फेकून दिल्यासारखं झालं असेल ! या रावसाहेबानं तुला फसवलं; हा रावसाहेब भित्रा, विश्वासघातकी ठरला ! देवी सारं जग—या रावसाहेबाला " हाच तो फसव्या रावसाहेब " म्हणून तुच्छतेनें माझ्याकडं बोट दाखवील ! " रावसाहेब नामर्द, रावसाहेब नामर्द "—म्हणून सारं जग माझा उपहास करील ! लक्ष्मी, आतां मी कोणत्या तोंडानं तुझ्यापुढं उभा राहूं ? तुला मी माझं नीच, दगलबाज, भित्रं अंतःकरण पुन्हां कसं दाखवूं ? नको नको हा जीव ! रावसाहेबा—विश्वासघातकी रावसाहेबा—काय केलंस हें. लक्ष्मीला विश्वास देऊन तिचा विश्वासघात केलास ! नको—लक्ष्मी माझ्याकडं अशी क्रूर मुद्रेनं पाहूं नको ! माझ्या कर्तव्यांत मी नादान ठरलों. भेंकड ठरलों ! क्षमा कर ! काय म्हणालीस ? माझ्या पराजयाचा डाग, माझ्या शत्रूच्या रक्तानं धुवून काढूं ? काढतो ! तुझी आज्ञा आतां हा रावसाहेबच काय, पण सारा आर्यावर्त ईश्वरी आज्ञेप्रमाणं पवित्र मानील ! माझ्या पराजयाचा सूड ? या काल्पींत कल्पांत करूं कीं या रावसाहेबाच्याच शरिरांतील हाडं नी हाडं उपसून, त्या जिवंत शस्त्रांनीं माझ्या शत्रूला लोळवूं ? काय—करूं काय ? माझ्या मायबहिणींच्या बे-अब्रूमुळं फोडल्या जाणाऱ्या कर्कश किंकाळ्या, लहान कोंवळ्या बालकांना आकाशांत फेकून, संगिनींच्या टोकावर झेलल्यामुळं त्यांच्या नाजूक देहांतून झालेला पवित्र रक्तपात. दुःखाचा हंबरडाही फोडायला सवड न दिल्यामुळं, कसायांच्या सुरीखालीं तडफडत प्राण सोडणाऱ्या मुक्या गोमातांचे आत्मे—हे पहा माझ्या भोंवतीं थैमान घालूं लागले ! धर्म-

छळामुळें धार्मिकांचा उडालेला हलकल्लोळ, आमच्या देवतांची होत असलेली विटंबना—अरेरे खूनाला खून—रक्तपाताला रक्तपात—क्रूरपणाला क्रूरपणा दाखवून झालेल्या पराजयाचा सूड घेऊं ? कोण-कोण लक्ष्मी ! हिंदुस्थानची विक्रम देवता ! लक्ष्मी आपल्या दुर्दैवाची कर्मकहाणी सांगण्याकरतां तूं मला इथं बोलावलंस कीं पराजयानं काळवंडलेल्या माझ्या तोंडाला तजेला देण्याकरतां तूं झांशीहून काल्पीला धांव घेतलीस ( तोंड फिरवून उभा रहातो. लक्ष्मी, आनंदराव व रामचंद्रराव येतात. )

लक्ष्मी:—श्रीमंत—

राव:—देवी पराजयानं काळं झालेलं हें तोंड मी तुला कसं दाखवूं ?

लक्ष्मी:—पराजय ! रावसाहेब आपल्या पराजयामुळें कां आपल्याला वाईट वाटतं ? किती दुबळं मन आपलं ! भीषण भवितव्याला पायीं लोळविणाऱ्या जीवाला, पराजयानं उत्साहाची उसळी यायला पाहिजे ! रावसाहेब वळून पहा या लक्ष्मीकडं ! झांशीची ही लक्ष्मी आज कोणत्या स्थितींत आपल्यापुढं आहे ? पराजयामुळं हृदयानं ठाव सोडल्यानं तोंडावर येणारी निराशेची किंचित तरी काळीमा दिसेल कां या तोंडावर ? बोला आपण असें दुःखी कां ?

रावसाहेब:—अपजयानं कचरून मरून जाण्याइतकं या रावसाहेबाचं मन दुबळं नाहीं ! पण ताई क्षमा कर ! माझ्या अपजयानं तुझा विश्वासघात झाला ! तुला मदत करीन असं आश्वासन मी तुला दिलं ! पण या रावसाहेबाला तें पाळतां आलं नाहीं. झांशीच्या जवळ येऊन मी माघार घेतली. शत्रूला पाठ दाखविली ! ताई क्षमा कर.

लक्ष्मी:—यांत क्षमेचं कांहींच कारण नाहीं ! रावसाहेब गेल्यागोष्टीचे हृदयाला जाचणारे विचार आतां सोडून दिले पाहिजेत ! अश्रु आणि निराशा दुबळ्याकरतां असतात. ध्येयापायीं जीवाची कदर न ठेवणं हेंच एकनिश्चयी वीराचं वैभव असतं. पुण्याची पुण्याई सरून पेशवाई बुडाली. आज झांशी दुर्दैवाच्या कालचक्रानं नामशेष झाली, याच कल्पना जर आतां मनांत बाळगल्या तर पुढचा मार्ग आपल्याला काय दिसणार ? जीवाची तमा न धरतां कर्तव्याकरतां पुकारलेली आपल्या आयुष्याची

प्रतिज्ञा, जीवाचं मोल घेऊन आपल्याला पुरी केली पाहिजे. रावसाहेब आतां पश्चात्ताप नको. तुमचा निर्वाणीचा निश्चय पाहिजे, कीं नामशेष होईन पण माघार घेणार नाहीं. झांशीच्या पुण्यपावन जीवांचा मी रण-यज्ञ केला आहे ! त्या जीवांच्या पुण्याईवर हें सांगण्याचा मला अधिकार आहे. रावसाहेब तुम्हाला कल्पना नसेल इतकी 'समरपूजा झांशीनं केली आहे.

**रावसाहेबः**—झांशीची ही पुण्याई साऱ्या जगाला आदर्शभूत झाल्याशिवाय रहाणार नाहीं ! पण मोरोपंत—

**लक्ष्मीः**—बाबा—कुठं बरं असतील ते ?

**रावसाहेबः**—म्हणजे ?

**लक्ष्मीः**—बाबा शत्रूच्या हातीं लागले !

**रावसाहेबः**—काय—काय बोलतेस मनूताई ? मोरोपंत शत्रूहातीं सांपडले ?

**लक्ष्मीः**—नाहीं. आपणहून ते शत्रूच्या हातीं सांपडले नाहींत. एका नराधम हिंदूनंच त्यांना विश्वासघात करून वैऱ्याहातीं दिलं !

**रावसाहेबः**—अरेरे ! काय ऐकतों मी ! राक्षसी हिंदा तुझी पोटची ही असुरी अवालद, केव्हां उलथून जाणार ?

**लक्ष्मीः**—घ्या साहेब, घ्या आपली ही कुलदेवता—ही पवित्र समशेर ! पेशव्यांच्या दिग्विजयाची ही लक्ष्मी, यापुढं आपल्याच हातीं रहाणं इष्ट आहे. निर्वाणीच्या प्रयत्नांत यापुढं या लक्ष्मीची हाडं रणांगणावर केव्हां पसरलीं जातील याचा नेम नाहीं. माझ्यामागं या दिव्य देवतेचा किंचितही उपमर्द झालेला या लक्ष्मीच्या आत्म्याला पाहवणार नाहीं ! या मराठ्यांच्या या शेवटच्या केशरींत शेवटच्या क्षणाला प्रत्येकाचं वैभव प्रत्येकाजवळच पाहिजे. घ्या ही समशेर ! या लक्ष्मीचं नशीब—

**रावसाहेबः**—तुझं नशीब ! तुझं नशीब तेंच साऱ्या हिंदुस्तानचं नशीब—

**लक्ष्मीः**—नाहीं. या लक्ष्मीचं नशीब हिंदुस्तानच्या नशिबाला कदा-चित् भलत्याच रितीनं रंगवील ! रावसाहेब ही लक्ष्मी मरून पडेल; पण

आर्यांचं वैभव–स्वातंत्र्य कायम राहील, असा आत्मविश्वास मनाला वाटूं लागला आहे ! या लक्ष्मीच्या मरणानं जर या हिंदुस्तानचं मरण थांबलं नाहीं, तर शस्त्रांचं राजकारण संपलं; निशस्त्र बुद्धियोगाला सुरवात झाली असं समजा ! बाळ दामोदराला माझ्या आनंदाला निःशस्त्र स्वातंत्र्य युद्धाची दीक्षा द्या. त्याच्या मागोमाग हजारो हिंदूंचे छावे, निःशस्त्राचं राजकारण चोखाळतील नी त्या स्वातंत्र्युद्धांत हिंद मातेच्या मस्तकीं स्वातंत्र्याचा हिरे मुकुट तळपत असलेला एक दिवस खात्रीनें दिसेल ! करा हात पुढं. ही समशेर नी हा बालयुवराज हातीं धरायला आपल्याशिवाय आतां कोण योग्य आहे ?

**रावसाहेबः**—तूंच ! देवी तुझ्यासारखी विक्रम देवता या आर्यावर्तांत संचार करीत असतांना, ही सेनानीची समशेर जर दुसऱ्या कुणाच्या हातीं गेली तर या पवित्र वस्तूचा अपमान केल्यासारखं होईल ! या लक्ष्मीच्या रूपानं प्रकट झालेल्या या भारतीय लक्ष्मीचं हें भूषण तिच्याच हातीं पाहिजे. या देवतेच्या पश्चात्–तिची प्रतिज्ञा परंपरेनें चालवून जीवाचं मोल देऊन, या अमोल वस्तुचं रक्षण करणं हीच आमची योग्यता ! मंगले, साऱ्या हिंदुस्तानच्या वतीनं ही सेनानीची समशेर मी तुझ्या हातीं देतो. हिचा अनादर करूं नकोस !

**लक्ष्मीः**—श्रीमंत या देवतेचा अनादर करण्याची पापी बुद्धी मला कधींच न होवो. ( तलवार घेते. ) पण श्रीमंत माझी एक इच्छा पूर्ण करा ! मृत्यूवर चाल करण्यापूर्वीं या तळमळणाऱ्या जिवाच्या समाधानाकरतां मला एक वचन द्या. माझ्या पश्चात् या लाडक्याचं रक्षण—

**रावसाहेबः**—हा बाळ आतां तुझा नाहीं. साऱ्या हिंदुस्तानचा आहे एवढं वचन—

**लक्ष्मीः**—मला अगदीं पुरेसं आहे !

**रावसाहेबः**—तर मग आतां पुढच्या उद्योगाला लागलं पाहिजे ! आतां या बाजूला रहाणं मुळींच सुरक्षितपणाचं नाहीं. शत्रू आपल्या भोंवतीं सारखा नाचत आहे. अशा वेळीं जर आपण ग्वालेरकडं—

लक्ष्मीः--माझाही तोच विचार आहे ! शिंदे आपल्याला मिळाले तर ठीकच--

रावसाहेबः--नाहींतर !

लक्ष्मीः--तलवारीच्या जोरावर त्यांना नमवूं !

रावसाहेबः--अशी तडफ असल्यावर आपलं दैवं आपल्यापुढं हात जोडून कां उभं रहाणार नाहीं ! बहुतेक तलवार उपसण्याची पाळी आपणांवर येणार नाहींच ! तात्या टोपेनं आपलं वजन शिंद्याच्या रिसाल्यावर चांगलंच बसविलं आहे.

लक्ष्मीः--तर मग हाच बेत कायम. आधीं तात्यांची भेट ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळ-झांशी राजवाड्यासमोरचं पटांगण. मध्यें फांशी उभारली असून लोकांची गर्दी झालेली आहे. सुंदरलाल कैदी आहे. ]

सुंदरः--( शिपायी त्याला ओढीत असतांना. ) धांवा धांवा ! हा देशाभिमानी वीर देशाकरतां कैदखान्यांत सांपडला आहे. त्याचा जयजयकार करा ! अरे कोणीच कां माझा जयजयकार करीत नाहीं ? कृतघ्न--सारे बेटे कृतघ्न--

हेस्टीः--Fool ! what nonsense ! टूम गिल्ला क्यौं करते हो ?

सुंदरः--( बाजूस ) या वांकड्या तिकड्या भाषेच्या कडेकपारींतून मी वांचणार कां ? ( उघड ) नाहीं साहेब मी आपल्याला शरण आहे. मी आपल्याला किल्ला पाडण्यांत मदत केली आहे. साहेब ! पाण्यांत वीष मिसळलं, किल्ल्यांतल्या दारुगोळ्याला आग लावली म्हणून माझ्यावर दयाळू इंग्रज सरकारनें दया करावी.

हेस्टीः––क्षमा ! Quite absurd ! हे होनं शक्य नाय ! टरी पन टू आमाला मडट केली–टूजा केसचा आम्ही इचार करल.

सुंदरः––तर मग हाय हाय ! देवा धांवरे धांव ! द्रौपदीच तुला काय देत होती ? तिच्या हांकेबरोबर धांवून जायला, तिनंच असं कोणतं पुण्य केलं होतं ! अरेरे परमेश्वरा, मला कारे नाहीं द्रौपदी केलंस ! साहेब, क्षमा करा. मी हिंदू झालों म्हणून तोंडांत मारून घेतों ! लहानपणीं रांगून गुडघ्याला घट्टे पडले तरी पुन्हां पाहिजे तर रांगून दाखवितों; पण दया करा. मी आपल्याला शरण––

मोरोपंतः––( पडद्यांतून ) सुंदरलाल, सुंदरलाल––

सुंदरः––कोण मामासाहेब ? झाला ब्रह्मघोटाळा !––

( रक्तानं न्हालेला जखमी मोरोपंत बंदीवान करून आणतात. )

मोरोपंतः––सुंदरलाल काय करीत होतास ?

सुंदरः––माझं कपाळ !

हेस्टीः––कौन ? बंडखोर मोरूपंट ? कशा शापडला ?

श्यामराजः–– मी या चोराला पकडला नी सरकारकदमाशीं हजर केला. बक्षीस आतां––

मोरोपंतः––बक्षीस ! पाजी निर्लज्या, स्वतःचं पोट जाळायचं होतं तर या अवाढव्य हिंदुस्तानांतल्या तेहतीस कोट प्राण्यांच्या तोंडचं एकेक शीत मिळून, अन्नाचा हिमालय तुझ्यापुढं पडला असता ! तुझ्या त्या राक्षसी किडून कुजून गेलेल्या मनाला दिपवून सोडणारी संपत्तीच तुला पाहिजे होती, तर हिमालयापासून-कन्याकुमारीपर्यंत आपल्या भिकार भाग्याची चौपदरी करून भीक कां नाहीं मागितलीस ? या कंगाल हिंदुस्ताननं कवडी कवडी करून, संपत्तीच्या राशीवर तुला बसवलं असतं ! पण असल्या पापानं कोणत्या पुण्याईचे डोंगर तूं उभारलेस ? तुझ्या-सारख्या पाप्यांची आंतडीं जिवंतपणीं तोडून काढायला रौरवांतलीं गिधाडं तुझ्यावर सोडलीं पाहिजेत ! देशबांधवांचा विश्वासघात करणारं तें बद-माष अंतःकरण, अस्मानच्या बिजलीनं फोडून त्याच्या चिंध्या उडविल्या

पाहिजेत. बोल, कोणत्या अधम वृत्तीनं तुला इतकं बदफैली, खुनी, मात्रागमनी बनवलं ? राष्ट्रमातेच्या निरीला हात घालणाऱ्या सैताना, बोल, कोणत्या नरकाच्या आशेनं तुला ही नरकवासना झाली ? या मोरोपंताच्या रक्तालाच तूं इतका हपापलेला होतास तर त्याला हा मार्ग कशाला पाहिजे होता ? तुझ्या हातीं मीं विश्वासानं मान दिली होती, ती आपल्या दगाबाज हातानं तिथंच मुरगळून माझ्या रक्ताच्या फवाऱ्यांत कां चिंब नाहीं झालास ?

हेस्टीः—आटा टे आमी करूं !

मोरोपंतः—त्या फवाऱ्यांत फिरणाऱ्या प्रत्येक रक्तबिंदूंत या मोरोपंताची संतापानं पेटलेली ही क्रूर मूर्ति दिसेल ! हा एक मोरोपंत या ठिकाणीं मरून पडेल, पण माझा हेतु सिद्धीस नेण्याकरतां या हिंदू पिशाच्याच्या या कृष्णकृत्याचा डंका अलम दुनियेंत गाजवण्याकरतां माझ्या रक्ताचा प्रत्येक थेंब देहधारणा करील ! त्या मायावी मोरोपंतानें फोडलेला टाहो हिमालयाच्या दरींत दडून बसलेल्या महात्म्यांच्या आत्म्याला हिंदूंच्या या अधःपाताची हकिकत सांगेल नी गर्भवासांत असणाऱ्या भावी पिढीचे चिमुकले वीर क्रोधानं बेफाम करून सोडील !

हेस्टीः—चूप—खुनी !

मोरोपंतः—काय खुनी ?

हेस्टीः— Yes खुनी ! Murderer !

मोरोपंतः—खुनी—खुनी—अरेरे खुनी ! ऐका, जगांतल्या जितांच्या मेलेल्या अंतःकरणांनो, गुलामगिरींत खितपत पडणाऱ्या जिवंत प्रेतांनो ऐका—राजनिष्ठ झांशी आज खुनी ठरली !

हेस्टीः—चूप ! shut up ! राजद्रोही ! खुनी !

मोरोपंतः—कोण खुनी ? निष्पाप रक्तानं कुणाचे हात माखले आहेत ? या मोरोपंताचे नाहीं—हें पहा हें रक्त अद्याप काळवंडलं नाहीं ! यांत खुनाची काळीमा कुणालाच काय पण प्रत्यक्ष खुन्याला सुद्धां दिसायची नाहीं. ही पहा—ही पहा ही—तोंड उघडं ठेवून बुलबुल बोलणारी—या मोरोपंताची ताजी जखम ' खुनी कोण ' याचा पुरावा देत आहे !

खुनाची काळीमा घालवण्याकरतां या लाल-निष्पाप रक्ताची ही पिचकारी कुणाकडं उडते ? बोला कुणाकडं ?

हेस्टीः––चलो, अडिक बोलू नको. सीपॉय, या बदमाष राजद्रोह्याला फासीवर चरवा ! मोरूपंट तुमी सरकारविरुद्ध बंड–

मोरोपंतः––नाहीं हें बंड नाहीं ! तर वैतागलेल्या जीवांचा तो मरत्या घडीचा तडफडाट होता. !

हेस्टीः––टे काय नाय ! टूमी बंड करून राजद्रोह केला हाय ! टवा अशा गूना पुना नाय होईल म्हून आमच्या न्याया परमानं टूमाला मरे-पर्यंत फांसीची सजा फर्मावीट हाय. सीपॉय––

सुंदरः––हाय हाय––

मोरोपंतः—सुंदरलाल ही शिक्षा ऐक. नी यदाकदाचित् तूं सुटलास तर माझ्या मनूला लाडक्या छबेलीला सांग कीं, मोरोपंत तांब्याचा खून न्यायानं केला ! मी फाशीं गेल्यावर तोंडाबाहेर पडणाऱ्या या मोरोपं-ताऱ्या दीड हात जिभेचा माझा देशबांधवांना टाहो फोडून निरोप सांग कीं, मोरोपंत तांब्याचं मस्तक झांशीच्या वाड्यासमोर भर दोन प्रहरीं न्यायाच्या अन्यायी फांसावर लटकलं गेलं ! माझ्याकरतां दुःखाचा एक अश्रूहि न ढाळतां याचा नीट विचार करा. माझ्या लाडक्या मनूला नि माझ्या आनंदाला माझा आशीर्वाद सांग.

हेस्टीः––चलो––

मोरोपंतः––हा चाललों. ( फांशीच्या फलकावर उभा रहातो. ) साहेब या मृत्यूचं–असल्या दिव्य मृत्यूचं भय कर्मनिष्ठ माणसाला कधींच वाटत नाहीं समजलास ? पुण्यश्लोकाच्या पतन पावलेल्या पुण्यपावन मस्तकांच्या फुलांचा रक्तवर्ण गालीच्या तुडवीत, आपल्या देशाच्या नांवानं वधस्तंभा-कडं जाण्याचं भाग्य फारच थोड्यांच्या नशिबीं असतं ! हा पहा माझा उद्धार करण्याकरितां मूर्तिमंत स्वर्गलोक या ठिकाणीं अवतरला आहे ! रात्रीच्या वेळीं आकाशांत चमकणारे दिव्य तारे या मेलेल्या महाभागांच्या डोळींच्या कोंदणांत प्रकटले आहेत. स्वर्गाच्या आवारांत नाचणारी विद्युल्लता, या वीरांच्या समशेरींत चमकूं लागली आहे. ती स्वर्गाल

स्वर्गत्व देणारी भगवान भास्कराची तेजोमय रक्तिमा या वीरांच्या रक्तानं रंगली आहे ! बोला हा स्वर्ग नाहीं का ? हें भाग्य सर्वांच्याच वाट्याला येईल का ? नाहीं. कधींही नाहीं. पवित्र मनांत हा देखावा स्वर्गीच्या संसाराप्रमाणं वाटेल; पण अनीतीच्या पायघडीवर हरघडी पावलं टाकणाऱ्या पातक्यांना नरकाचं नाचतं चित्र यांत दिसेल. चला हा मोरोपंत आपखुशीनं फाशीं जायला तयार आहे. माझ्या लाडक्या जगजीवन देशा, या जन्मीं नाहीं पण निदान स्वर्गातून तरी, स्वातंत्र्याचा दिव्य मुकूट तुझ्या मस्तकावर झळकलेला मला दिसूं दे !

हेस्टीः—चढवा टेला. ( मोरोपंतास फांस लावतात. )

मोरोपंतः—‘ वंदे मातरम् ’ ! हेस्टी–Hail Britania. (पडदा).

— अंक चवथा समाप्त —

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

( स्थळ—ग्वाल्हेर—कामिनी डोळ्यांवर बांधण्याकरतां पडदा घेऊन येते. )

**कामिनीः**—माझ्या लाला, मला फसवून कुठें हो गेलांत? तुम्ही गेल्यापासून दुसऱ्या पुरुषाकडं पहाण्याचा प्रसंग फारसा येऊं नये; म्हणून पुरुष दिसला कीं, डोळ्यांवर असा पडदासुद्धां घेतें हो! आतां मी तुमच्या विरहानं मरून गेलें म्हणजे मग कुणाशीं बरं लग्न लावूं? लाला या ना! झांशी पडली त्यावेळीं तुम्ही पळालांत तें अजून कसे हो येत नाहीं? (दूर अंतरावर सुंदरलाल शिपायाच्या वेषांत दिसतो.) अगं बाई, तो पहा मेला कुणी घटिंगण येतो आहे! सुंदरलाल देवीला स्मरून मी आतां परपुरुषाला आंधळी झाली आहे हो!

( डोळ्यावर पडदा घेते. इतक्यांत सुंदरलाल खालीं पहात शिपायाच्या पोशाखांत 'लेफ्ट राईट' करीत येतो. त्याचा धक्का कामिनीस लागतो. )

**कामिनीः**—अग आई गं! कोण रे मेल्या तूं? डोळे फुटले कां?

**सुंदरः**—( डोळे झांकून ) अरेच्या ही काय पीडा? ही सुंदर वाटतं? ( उघड ) चुकलों—मी—माफ करा. मी एक आंधळा आहे.

**कामिनीः**—आंधळा? मेल्या माझ्या डोळ्यांवर जर हा पडदा नसता, तर तुला ओळखून तुझी चामडीच लोळवली असती!

**सुंदरः**— आमचा तोफखानाच हा! त्याशिवाय इतका झपाटा नाहीं यायचा. ( उघड ) काय—तुम्हाला पण दिसत नाहीं? पण बाई मला आंधळा व्हायला जसं कांहीं कारण आहे, तसं तुमच्या आंधळेपणाला आहे कां?

**कामिनीः**—तुमच्या आंधळेपणाला कारण आहे? तें कोणतें?

**सुंदरः**—मी एका काळतोंडीला भीत आहे! ती या देवडीवर दिसेल म्हणून मी आंधळा झालों आहे!

**कामिनीः**—म्हणजे तुम्ही सुंदरलाल की काय? पण तुम्ही फसवत तर नाहीं ना मला? तुम्ही दुसरेच कोणी असला नी मी डोळे उघडले तर माझा ' पण ' मोडून पाप लागेल. तुम्ही एकादे फटिंग——

**सुंदरः**——पण अहो बाई, मी जर एकादा फटिंग असतो, तर बायको पायीं आंधळा कां झालों असतों ?

**कामिनीः**——काय बायकोपायीं आंधळे ! म्हणजे या कामिनीचे सुंदरलाल.

**सुंदरः**——कोण कामिनी ? पण मला नाहीं हें खरं वाटतं ! या देवडी-वर बाईसाहेब सुंदराशिवाय दुसरी कोणती मुलूखमैदान ठेवणार. तिचं तोंड पाहण्यापेक्षां जन्मभर आंधळ रहाणं मला पुरवलं !

**कामिनीः**——अहो खरंच मी तुमची कामिनी आहे !

**सुंदरः**——कशावरून ? देवीची शपथ घेतेस ? माझी भोळी कामिनी देवीला फार भिते !

**कामिनीः**——देवी शपथ मी कामिनीच आहे. पण तुम्ही सुंदरलालच ना ? मला दिसत नाहीं नी तुम्ही पहात नाहीं ! आतां काय करूं ? उघडूं कां डोळे ? पण नाहीं—प्रथम तुम्हीच उघडा.

**सुंदरः**—मी नाहीं उघडणार ! प्रथम तूंच उघड ! पण असं कशाला? आपण दोघे एकदमच डोळे उघडूं या ! म्हणजे कुणाकडेच दोष येणार नाहीं. ( स्वगत ) परमेश्वरा, ही जर खरोखर सुंदरच असेल, तर दारूच्या भडक्यानं नाहीं तर नाहीं पण माझ्या डोळ्यांत सांठविलेल्या तेजानं हिची रक्षा होवो. (उघड) हं उघड डोळे. खरंच कीं. माझी कामिनीच तूं !

**कामिनीः**——अगं बाई, खरंच कीं माझे सुंदरलालच तुम्ही !

**सुंदरः**——पण त्या राक्षसणीऐवजीं तूं कशी इथं ?

**कामिनीः**——बाईसाहेबांनीं माझी नेमणूक देवडीवर केली नी तिला अलीकडे खास तैनातींत घेतलं आहे ! पण तुम्ही कसे आलांत ?

**सुंदरः**——तें कुठं बोलायचं नाहीं ! पाण्यांत तूं पूड मिसळलीस तिच्या पुण्यप्रभावानं मी इथं आलों !

**कामिनीः**——खरं कां हें ?

**सुंदरः**——खरं म्हणजे ? ज्यानं मला पूड दिली होती, त्या साहेबाच्या प्रेमळपणामुळं मी इंग्रजांच्या तावडींतून सुटलों ! तूं पाण्यांत पूड टाक-

लीस, मी सुंदरला मारण्याकरतां कोठाराला आग लावली ! पण याच्या-मुळं फायदा झाला त्या इंग्रजांचा ! झांशी पडल्याबरोबर बाईसाहेबांना किल्लाच सोडावा लागला !--

कामिनीः--पण ग्वालेरच्या वेशींतनं कसे आलांत ?

सुंदरः—माझ्या ओळखीचे बाईसाहेबांचे कांहीं लोक वेशीवर होते! मामासाहेब फांशीला गेले ही बातमी बाईसाहेबांना सांगायची आहे असं म्हणतांच त्यांनीं माझा झाडा घेऊन मला आंत सोडून दिलं !

कामिनीः— काय ? मामासाहेब फांशीला गेले ? अरे देवा रे--

सुंदरः--खरोखर काय तो भयंकर देखावा ? अंगावर अजूनसुद्धां शहारे येतात ?

कामिनीः--पण हा शिपाईथाट ?

सुंदरः--तें सारं तुला मग सांगेन ! आधीं बाईसाहेबांना मामासाहे-बांची बातमी कळवूं दे !

कामिनीः--थांबा हो जरा ! आधीं तुमची सारी हकिकत त्या तिथं बसून मला सांगा ! चला--

---

## प्रवेश दुसरा.

( स्थळ--ग्वाल्हेर-लक्ष्मीचा तंबू. लक्ष्मी व रामचंद्रराव प्रवेशतात.)

लक्ष्मीः—काय म्हटलंत रामचंद्रराव श्रीमंतांनीं आज दरबार भर-वला आहे ?

रामचंद्रः—दुर्दैवानं ही बातमी खरी आहे ! शिंद्यांचा मोड होऊन त्यांनीं पळ काढला तो आपल्या तलवारीमुळं नी आपल्याकडं रावसाहेब आतां पहातसुद्धां नाहींत !

लक्ष्मीः—देशमूख, याचा अर्थ श्रीमंत कृतघ्न असा मात्र नाहीं. त्यांच्या उतावळ्या स्वभावामुळं, त्यांच्या हातून असे प्रमाद होतात. कांहीं असलं तरी त्यांच्या हातून होत असलेली गोष्ट यावेळीं तरी अयोग्य आहे ! शत्रूनं गांवाला वेढा दिला असतांना, श्रीमंतांनीं स्वस्थ रहावं

म्हणजे मूर्खपणाची कमाल आहे ! रामचंद्रराव माझा घोडा तयार ठेवायला सांगा ! श्रीमंतांना जागं करणं यावेळीं माझं कर्तव्य आहे ! जा. ( रामचंद्रराव जातात.)

आनंदः—( प्रवेशून ) आई—

लक्ष्मीः—आई ! ही या तान्हूल्याची शेवटची हांक कां ? माझ्या या अभागी कानांना या लडिवाळाच्या 'आई-आई' अशा सारख्या मारलेल्या हांका आणखी किती दिवस ऐकायला मिळणार ? आनंदा मार अशाच 'आई-आई' म्हणून सारख्या हांका मार ! या तुझ्या आईचा देह पडेपर्यंत 'आई आई' असा शब्द माझ्या कानावर पडूं दे.

आनंदः—आई-आई.

लक्ष्मीः—ऐका-माझ्या कानांनो हा मोहक स्वर तुमच्या श्रवण शक्तींत सारखा घुमूं द्या ! डोळ्यांनो पहा-या माझ्या छकुल्याच्या तोंडाकडे सारखी टक लावा. नी 'आई' अशी हांक मारतांना फुलून दिसणारं याचं मुखमंडळ आपल्या दृष्टीपटावर रेखून ठेवा ! म्हणजे डोळ्यांतली तेजज्योत मालवल्यानंतर सुद्धां याची मनमोहन मूर्ति तुमच्यांत कायम राहील ! देवानं मला जन्माला तरी कशाला घातलं ? तुझ्या 'आई-आई' अशा केंविलवाण्या हांका ऐकायला कां ?

आनंदः—आई-तूं रडतेस कां ? मागं तूं रडत नव्हतीस.

लक्ष्मीः— रडतेस कां ? मागं मी रडत नव्हते ? नी आत्तांच या लक्ष्मीनं कां रडावं ? देवानं नी दैवानंही रडवलं म्हणून बाळ ! वीरांच्या आत्मीक तेजाला परिस्थितीची गुलामगिरी सहन होत नाहीं. पण प्रेमाचं दास्य त्याला करावंच लागतं...म्हणून बाळ !

आनंदः—आई, आपले मामा आले नाहींत म्हणून कां तूं रडतेस ?

लक्ष्मीः—तुझे मामा! बाळ, या लक्ष्मीचे बाबा-जिथून गेलेला मनुष्य फिरून कधींच येत नाहीं अशा दिव्य लोकांत गेले असतील; त्यांच्याकरतां मी कशाला रडूं ?

आनंदः—मग कुणाकरतां रडतेस ?

लक्ष्मीः—तुझ्याकरतां ! माझ्या प्रेमाच्या या ठेव्याकरतां ! माझ्या मागं तुझं काय होईल ?

आनंदः—पण तूं नेहमीं नाहीं कां सांगत कीं, आपल्या रामानंसुद्धां सीतालक्ष्मणाबरोबर रानावनांत दिवस काढले—

लक्ष्मीः—हो काढले ! पण प्रेमाचा पुतळा लक्ष्मण आज लाखांत तरी तुला मिळेल कां ? देहाची वेली नी प्राणाचीं फुलं करून त्यावर श्रीरामचंद्राला झेलून धरणारी साध्वी सीता अजून तुला लाभली नाहीं ! पण छे, त्या सीतामाईचीच माता, ही जगन्माता भूमी तुझं रक्षण करायला तयार असतांना तुला कुणाचीच जरूरी नाहीं ! माते राष्ट्रभूमी, तुझ्या पोटीं आलेल्या हजारों जीवांकरतां या डोळ्यांत अश्रु न येतां, मनुष्य स्वभाव म्हणून माझ्या या आनंदाकरतां अश्रु ढाळण्याचा स्वार्थ साधला. त्याची क्षमा कर मला! कारण माझ्या बाळाकरतां हे डोळ्यांतील अश्रु, पण तुझ्या संतानाकरतां माझे रक्ताचे थेंब गाळीन ! जा बाळ घोडा तयार आहे कां पहा जा.

आनंदः—आत्तां पाहून येतो. पण तूं रडूं नकोस—

लक्ष्मीः—नाहीं, मुळींच नाहीं. ( आनंद जातो. ) या हंसऱ्या बाल जीवाची जाणीव किती निर्विकार आहे ? माझ्या डोळ्यांत अश्रु आले कीं, याच्याही डोळ्यांत अश्रुनं उभं रहावं ! माझं तोंड हंसरं—मग ते बळंच कां असेना—हंसरं दिसलं कीं, याच्या तोंडच्या गुलाबांनींही हसूं लागावं ! नी असलं पाडस—असलं काळजाच्या कोंदणांत ठेवायचं रत्न या पसाऱ्याच्या जगाच्या अडगळींत टाकून जायचं ? रडूं नको—रडूं नको ! बाळ रडूं नको तर काय करूं ? ते तुझे छकुले हात—माझ्या हातून कायमचे सुटत असतांना, ते तुझे विशाल हंसरे डोळे या अभागी डोळ्याआड होत असतांना, परलोकच्या पायरीवर पाऊल ठेवलेल्या या लक्ष्मीच्या डोळ्यांत जिव्हाळ्याचं पाणी चमकलं तर त्यांत नवल काय ? हा कर्तव्याचा मार्ग जर माझ्यासमोर नसतां तर या तुझ्या मातेनं सारं ब्रह्मांड तुझ्यावरून ओवाळून टाकलं असतं ! माझ्या जीवाच्या कलिजा, या कौसल्येच्या कर्महीन कुमारा, तुझ्यावरून ओवाळणी—माझ्या वात्सल्यप्रेमाची शेवटची कुरवंडी म्हणून ही मोत्याची माळ तुझ्या गळ्यांत घालते ! हीच तुझं साऱ्या संकटांत रक्षण करील.

( आनंद धांवत येतो. लक्ष्मी त्याच्या गळ्यांत मोत्यांची माळ घालते. )

आनंदः—आई, घोडा तयार आहे; पण हें काय ?

लक्ष्मीः—हें–हें कांहीं तरीच. चल, मी वाड्यांत जाऊन येईपर्यंत तूं आपल्या सुंदरशीं खेळ हं—

---

## प्रवेश तिसरा

( स्थळः—ग्वालेर. रणांगणाची एक बाजू. सुंदरलाल शिपायाच्या वेषांत कामिनीसह प्रवेश करतो. )

सुंदरः—खरोखर कामिनी, हे शिपाई लोक कसे जगत असतील; कोण जाणे ? हे कपडे घातल्यापासून एक घटका कांहीं लोटली नाहीं; पण एकाद्या बिनहवेच्या पेवांत मला फेकून दिल्यासारखं झालं आहे !

कामिनीः—मग टाकून कां द्याना तो !

सुंदरः—अगं आपण इथं मुंदरचं मरण पहावयाला जरी आलों असलों तरी पण आपल्याला जिवंत रहावयाचें आहे, हें आपण लक्षांत ठेवलं पाहिजे. लोक जीव जावा म्हणून शिपाई होतात; मी जीव वाचवण्याकरतां शिपाई झालों आहे. या पोशाखांत मी असलों तर आपल्यांतलाच एकादा शिपाई असेल, असं समजून हे लोक माझ्याकडं मुळींच लक्ष देणार नाहींत !

कामिनीः—लालजी, तुम्ही तरी बरेच दिसतात हो ? आपल्या जीवाची तेव्हढी तुम्ही काळजी घेतलीत नी माझ्या—?

सुंदरः—अगं तुला तर या सैन्यांत मुळींच भय नाहीं. मराठे बायकांना जीव गेला तरी रणांगणावर कधींच हात लावायचे नाहींत ! मग जिवंतपणीं तर नाहींच नाहीं. चल आपण या दगडाआडून लढाई पाहूं ! ती कपाळकरंटी मुंदर एकदां आटोपलेली दिसली कीं,एकदम इथून सूं त्या–नी घोड्यावर पाय–( लपतात. )

मुंदरः—( मर्दानी वेषांत प्रवेशते ) कोण ! कोण आहे ते ?

सुंदरः—अरे बापरे ! कामिनी, आतां ग ? लग्नघटकेऐवजीं आपली शेवटची घटका भरली वाटतं ?

मुंदरः—कायरे ? कोण आहे ?

कामिनीः--( हळूंच ) चला, हळूंच पळ काढतां कां ?

सुंदरः--( हळूंच ) अग, त्याचीच भ्रांत आहे. अग, क्षण जायची जिथं आतां वानवा तिथं पळ कसा काढणार ? पण थांब. मीं शिपायाचा पोशाख केला आहे नाहीं कां ? सुंदरनं पट्ट्याचे हात शिकविलेच आहेत ! शिवाय झांशींत इंग्रज सैन्यांत जे हुकूम सुटत असत, ते मी कैदी असतांना पाठ केलेले आहेत. त्या साऱ्या ज्ञानाची उजळणी इथं करतो ! एकादा बाजारबुणगा असेल तर पळेल भिऊन–( पुढं होऊं लागतो, कामिनी त्याला बसविते.)

कामिनीः---अहो मराल उगीच ! हातीं तलवार नाहीं.

सुंदरः—तलवारीचा हात आहे-तिथं हातीं तलवार कशाला पाहिजे ?

कामिनीः---अगं बाई हे सुद्धां भडकले !

सुंदरः---उत्तर कां नाहीं ?

सुंदरः---( स्वगत ) काय बरं नियम ? हां उजव्या पायाची मेडी आन् डाव्या पायाचा चंपा ठेवून शान–चक्रावाणी गर्कन फिरायचं ! लेफ्ट टर्न ( उजवीकडे वळतो. ) अरे ही तर आमची बोलभांड ! आतां दाखवतोच पराक्रम ! हॉल्ट ! सॅल्यूट ( सलाम करतो ) अटेंशन ! लाय डाऊन ( पडतो ).

सुंदरः—कोण ? इकडं ?

सुंदरः—होय. इकडंच बरं ? पण अजून मेली कशी नाहींस ? मी इतकं शौर्य गाजवलं तरी तूं अजून जिवंत ? म्हणजे काय गोष्ट आहे ?

सुंदरः---हें काय शौर्य ! असल्या शौर्यानें फुकट कुठं तरी मरून जाल ! हा इंग्रजी पोशाख जर कुणी इकडच्यानं पहिला तर शत्रु म्हणून फट्कन गोळी घालतील.

कामिनीः—( धांवत पुढं येऊन ) तर मग ऐका–माझं ऐका ! द्या टाकून ते कपडे ! वाटल्यास मी ते अंगावर घालते. पण तुम्ही ते टाकून द्या.

सुंदरः---( स्वगत ) भोळ्या कामिनी, जिंकलंस मला आज तूं !

सुंदरः---अर्रर ! हा इंग्रज शिपायाचा पोशाख हें मी विसरलोंच. शत्रुकडून प्रेत होण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून झांशींतच एका बिन-

वारशी प्रेताचा पोशाख अडकवला अंगांत नी आतांपर्यंत जीव वांचवला पण —

**सुंदरः**—आतां मात्र तो जाण्याचाच संभव आहे ! या पोशाखांत तुम्ही असतांना मी तुमच्याशीं बोलत असल्याचं जर कुणी पाहिलं तर मलाच 'शत्रूशीं खलबत करीत आहे' म्हणून गोळी बसेल. काढा—काढा—ते कपडे नाहीं तर——

**कामिनीः**—अगबाई, नको ग त्यांना मारूस ! मला मार वाटल्यास ! लालजी काढा हो ते कपडे ! हें आपल्या लग्नांतलें विघ्न आहे !

**सुंदरः**—अग मेले, मी तर आज मरणारच ! पण तूं या मूर्तिमंत विघ्नाशीं कां लग्न लावणार ? हे कपडे यांच्या अंगावर असले म्हणजे संकटाला कांहींच तोटा नाहीं.

**सुंदरः**—चूप.

**सुंदरः**—हं खबरदार ! मूर्खपणाचं झालं एव्हढं प्रदर्शन पुरें झालं ?

**सुंदरः**—अरेरे—अधःपात, धर्माचा अधःपात झाला ! या ज्वालामुखीचें तोंड लिंपायला हिमालयाचा बोळा यांत घालूं कीं, ब्राम्हांडाचा बोळा यांत कोंबू ? मी शिपाई बनल्याचा हिला कांहींच कसा अभिमान नाहीं ? नुसता लष्करी पोशाख केलेल्या रणमर्दांच्या गळ्यांत फुलांचे झेले नी गोंडस हातांच्या माळा घालून त्यांच्यावरून जान कुरबान करणाऱ्या रसिक रमणी कुणीकडं नी आमच्या या हिंदी हिडींबा कुणीकडं ?

**सुंदरः**—मी तुमच्या कल्याणाची गोष्ट सांगते.

**सुंदरः**—तूं ज्या दिवशीं माझ्या गळ्यांत पडलीस, त्यांच दिवशीं माझं जन्माचं कल्याण झालं आहे ! हे घे काढले कपडे—( कोट, हॅट वगैरे काढतो. )

**कामिनीः**—झालं बाई आतां तुझं समाधान ?

**सुंदरः**—हो झालं ! आतां वाटल्यास हातीं तलवार घ्या नी तुमचं शौर्य दाखवायला माझ्याबरोबर चला—

**सुंदरः**—मी लढूं शकतो ! पण आतां मी बाबरलों आहे ! शिवाय तुझ्यासारख्या स्त्रिया जर पुरुष होऊन अशा फिरूं लागल्या, तर आम्ही पुरुषांनीं आतां घरींच बसलं पाहिजे.

सुंदरः––ठीक आहे ! तसचं करा ! कामिनी-इकड, ये ! अगं भिऊं नको.

कामिनीः––आणखी मला आतां तूं काय करणार ?

सुंदरः––अगदीं तुझ्या मनाप्रमाणं !

कामिनीः––म्हणजे ?

सुंदरः––आजपर्यंत मी तुला वैरीण वाटत होतें ना ? अग, अशी भितेस काय ? पण आज किं नाहीं, मी तुझी ती कल्पना खोटी ठरवणार आहे !

कामिनीः—हें तूं काय बोलते आहेस ? मला कांहीं समजत नाहीं.

सुंदरः—तुझा हात दे माझ्या हातीं म्हणजे समजेल ! ( कामिनी हात देते ) मी आज आपखुशीनं तुझा हात इकडच्या हातीं देतें.

( कामिनीचा हात सुंदरलालच्या हातीं देते )

सुंदरः—' शुभ मंगल सावधान ' सुंदर सावध आहेस ना ?

सुंदरः—अगदीं पूर्ण सावध आहे.

कामिनीः—माझी देवी आज नवसाला पावली ! सुंदरबाई, मीं तुमच्या पायां पडते ! तुम्ही किती हो चांगल्या आहांत ? किती तरी गोड किती तरी– काय बरं ? काय बरं आहांत ?

सुंदरः––कामिनी, यांत मी विशेष तें काय केलं ? माझ्या आयुष्याच्या शेवटच्या दिवशीं मी तुझा नी यांचा संयोग केला येव्हढंच ना ? अगं उद्या जें होणार होतं तें आज झालं !

कामिनीः—हें काय तुम्ही बोलतां ?

सुंदरः—दैवानं आज दावा साधला आहे ! आज आम्हांला मरण्या-शिवाय मार्गच नाहीं. जातें मी. बाईसाहेबांचा जो निश्चय तोच माझाही निश्चय ! जगून वाचून आलेंच तर तुमच्या प्रेमांत मला थोडीशीं जागा द्या म्हणजे झालं !

कामिनीः––मग बाई तुम्ही जाऊंच नका कशा ? मला काय माहीत कीं तुम्ही इतक्या प्रेमळ आहांत म्हणून ! मी तुम्हांला आजपर्यंत उगीच टाकून बोललें ! पण आतां अगदीं तुमच्या आज्ञेनं वागेन ! मग तर झालं ना ?

सुंदरः—कसं करूं तसं ? बाईसाहेब म्हणजे माझ्या जीव जा आतां इथून ! सुखानं संसार करा. ( पडद्यांत रणवाद्यांचा ऐका रणशिंग वाजलें ! बाईसाहेबांचा रिसाला निघाला ! जाते देव मी आजपर्यंत आपल्याला छळलं, पण पतीच्या दगडाचा दे ण्याकरतां त्याच्या पत्नीनं बेमुर्वतीची टाकी अवश्य हातीं घेतली या भावनेनं माझं आजपर्यंतच वर्तन झालं ! त्याची क्षमा करा.

सुंदरः—अरे, तूं इतकी समजूतदार शहाणी होतीस कां ? गेली कामिनी मला काय होतंय म्हणून सांगू ?

कामिनीः—प्रसंगच विलक्षण ! देव तिला सद्गतीच देईल !

सुंदरः—हुश्श ! या सुंदरलालच्या संसाराचा हास्यरस शेव शोकरसच झाला ना ? चल कामिनी झालं तें झालं ! गतं न शो चल आतां पुढच्या उद्योगाला लागलं पाहिजेना ? माणसं आ आपण. ( जातात ).

---

# अंत्यलहरी

[ स्थळ—ग्वालेर–रणांगण. लक्ष्मी मर्दानी वेषांत एका घोडीवर बसली आहे. पुढें वाहणाऱ्या जलप्रवाहाला बिचकून घोडी अडून राहिली आहे असा देखावा. ]

लक्ष्मीः—चल बिजली, पुढं चल ! काय रणांगणांतून पाय का तुझी तयारी नाहीं ? हो–हेंच कारण. नाहींतर या दीडहात प्र पाहून तूं कां बिचकतीस ! रक्ताच्या नद्या ओलांडून जाण्याकरतां चालणाऱ्या तुझ्या पायांना या एव्हढ्याशा प्रवाहाचें भय वा " महाराणी लक्ष्मीनं रणांगणांतून पळ काढला " असा डाग मला नये म्हणून तर तूं अडून राहिली नाहींस ना ?

( दूर अंतरावर सुंदर वगैरे ' बाईसाहेब पळा–जीव वांचवा– असा ओरडा होतो. लक्ष्मी घोड्यावरून उडी मारते. )

लक्ष्मीः--जीव वांचवूं? आतां जीव वांचवून काय करायचं? ज्या जिवाच्या आशेनं जगांत जगायचं, तो स्वातंत्र्याचा जीव, जिवाला पारखा झाल्यावर जगण्यांत काय हंशील? कर्तव्याची निराशा म्हणजेच माती! जिवाची माती झाली--तरवार उपसते. (पडद्यांत-ऑन रश ऑन) या एक या-हजार या. जहरी प्राण्याच्या करारी कदरेंत नसेल इतका जहरी-पणा निराश जिवाच्या निर्वाणीच्या तडफेंत असतो! (कांहीं युरोपियन शिपाई तिच्यावर हल्ला करतात. तिला कांहीं वार होतात ती शिपायांना पिटाळून लावते.) संपला आज या महाराणी लक्ष्मीचा अवतार संपला. रणांगणांतून पळ! छे:! ही कल्पनासुद्धां या जिवाला जाळीत जाते. नाहीं! माझ्या भवितव्याशीं मी मरेपर्यंत झगडणार. माझ्या बाबांनीं आनंदानं-अगदीं हंसत फांसावर आपल्या दिव्य आत्म्याची समाधी बांधली. अश्रूंचा एक थेंब, पश्चात्तापाची एक छटा त्यांच्या डोळ्यांत दिसली नाहीं; असंच सुंदरलाल सांगत होता! त्याच वीराची मी मुलगी आहे. या लक्ष्मीच्या कपाळीचा सौभाग्याचा टिळा गेला, पण त्या ठिकाणीं 'नामर्दाचा टिळा'-नाहीं! देवानं पांढरं फटफटीत पाडलेलं हें कपाळ आतां देवाच्या देवाला सुद्धां कलंकित करतां येणार नाहीं!

(रामचंद्रराव व सुंदर आनंदाला घेऊन येतात)

रामचंद्रः--सरकार, बालराजांचं रक्षण करा! शत्रूनं आपल्याला पाहिलं--पळा आम्ही शत्रूला थोपवून धरतो!

सुंदरः--बाईसाहेब, चला कुठं तरी दडून रहा.

लक्ष्मीः--वेडे जीव! या जित्या जिवाची तुटती ढाल आतां या लेकराचं रक्षण कसं करणार? परमेश्वरी इच्छा असेल तर अजूनसुद्धां मेवाडपती रणधीर प्रतापानं सोसले नसतील इतके भयंकर हाल सोसून हा जिवंत राहील!

सुंदरः--बाईसाहेब, बालराजांचं आपलं आजपर्यंतचं प्रेम कुठं गेलं?

लक्ष्मीः--या हृदयांत तें आहे! हातांतल्या समशेरीनं हें हृदय उकलून पहा--माझ्या आनंदाच्या प्रेमाचा पूर यांतून बाहेर पडेल. हा कठोरपणा माझ्या भविष्याचा!

सुंदरः--चला वेडा विचार सोडून द्या! हें ठिकाण सुरक्षित नाहीं.

लक्ष्मीः--म्हणजे ? मी रणांगणांतून पळ काढूं म्हणतेस ?

रामचंद्रः--सरकार, पळा--पळा हो पळा--

सुंदरः--अगबाई, ते पहा शत्रूचे लोक अगदीं जवळ आले !

लक्ष्मीः— तर मग माझा आत्मयज्ञ जवळ आला ! आपल्या देश-बांधवांच्या मूर्खपणानं फोफावलेली परिस्थिति बलिष्ठ कीं निश्चयी जीवाचा पराक्रम बलिष्ठ याचा निर्णय आतांच होऊन जाईल. रामचंद्रराव बाळाचं रक्षण तुम्ही करा. तुमच्या ओट्यांत त्याला निरवते--

( हुसर्स व हेस्टी–ए अप-अशी आरोळी मारून सर्व बाजूंनीं तुटून पडतात. सुंदर व लक्ष्मी लढतात. )

आनंदः—आई ग, आई—

लक्ष्मीः--बाळ, तुझी आई आतां तुला स्वर्गांत भेटेल !

सुंदरः--बाईसाहेब मेले हो मेले ! ( वार लागून मरते )

लक्ष्मीः--( लढतांना ) मेलीस ! देव सद्‌गती देईल तुला ! मलाही फार वेळ नाहीं रहायचं !

( इतक्यांत रक्तानें न्हालेला रावसाहेब, तात्या वगैरे प्रवेश करतात. हुसर्स व हेस्टी पळतात. लक्ष्मी घायाळ होऊन पडते. )

आनंदः--आई !

लक्ष्मीः--रावसाहेब बाळाला पदरांत घ्या ! रामचंद्रराव त्याच्या साऱ्या रक्षणाची जबाबदारी आतां तुमच्यावर आहे. माझं शरीर शत्रूच्या हातीं लागूं देऊं नका !

रावसाहेबः--देवा काय पहातो हें मी ! लक्ष्मीताई, काय ही तुझी दशा ?

लक्ष्मीः--रावसाहेब आतां रडण्यांत काय अर्थ आहे ? तुम्ही कशाकरितां म्हणून रडणार ? या लक्ष्मीच्या साडेतीन हात देहाच्या चिंधड्या झाल्यामुळें तिचा प्राण आतां स्वर्गांत जाणार म्हणून रडणार. आजपर्यंत हजारों जीवांचे बळी निष्कारण रणदेवतेला गेले म्हणून रडणार कीं, स्वातंत्र्याला मुकून आपली तोंडं आतां मातींत खुपसण्याचा आपल्या-वर प्रसंग आला म्हणून तुम्ही अश्रु ढाळणार ? तुम्ही रडूं लागाल तर सारं ब्रह्मांड तुम्हाला तुमच्या अश्रूंनीं भिजवावं लागेल ?

**रावसाहेबः**—बोल रणदेवते बोल ! या वेळेचा तुझा प्रत्येक शब्द मी माझ्या हृदयपटावर लिहून ठेवीन; नी तो उपदेश साऱ्या जगाला सांगेन !

**लक्ष्मीः**—तर मग ऐका ! आज हा तुमच्यावर रडण्याचा प्रसंग आला तो तुम्ही नामर्द म्हणून नाहीं. रावसाहेब भीमाची शक्ति असूनही आपण दुबळे ठरलों.

**रावसाहेबः**—हो खरंच ठरलों ! नाहींतर आज खालीं मान घालायचा प्रसंग कधींच आला नसतां.

**लक्ष्मीः**—तर मग जा–! या आर्यावर्ताच्या माझ्या आयाबहिणींना या लक्ष्मीनं आपल्या मृत्यूशय्येवरून सांगितलेला हा शेवटचा निरोप कळवा, कीं आपल्या पतींना तेजस्वी पांडव बनवण्याकरतां, त्यांच्या मेलेल्या सद्गुणांना जिवंत करण्याकरितां जिवाच्या जिवांत लपून बसलेल्या आपल्या स्वयंतेजाची संजिवनी करा; पण द्रौपदीच्या देशाचं नांव राखा ! माझ्या देशांतल्या आज्ञान कुमारिकांनो, माझ्या आनंदासारख्या छकुल्या भावी पिढीच्या मातांनो, पदरीं पडणाऱ्या पतित पतींना पावन करण्याकरतां आपल्या गुणांची गंगा करा, पण स्वतःला सत्वाची सुशिला म्हणवून घ्या ! रावसाहेब, दुर्दैवानं तुमच्या पतीत झालेल्या ताज्या तरुणांना, माझ्या भावांना या त्यांच्या व्याकूळ बहिणींची विनंती सांगा, कीं पतित पुरुषांनो पतित परावर्तनाकरतां तुमच्या हृदयावर वज्राप्रमाणं प्रहार करणाऱ्या आपल्या गृहिणीवर न रागावतां प्रेमाचं छत्रच धरा ! कारण दैवयोगानं जर त्यांच्या प्रयत्नाला यश न येतां पापाच्या कड्यावरून तुमचा कडेलोट झाला, तर तुमच्या देहांत झेलून धरण्याकरतां स्त्रियांची वज्राची अंतःकरण वेली फुलांच्या रूपानं त्या पापाच्या दरींत उभी राहतील !

**रावसाहेबः**—ताई हा निरोप जगाला सांगण्याचं माझ्या वाट्याला आलं, हें मी माझं भाग्य समजतों.

**लक्ष्मीः**—थांबा या घोटाळणाऱ्या जीवाचा एकच शेवटचा निरोप ! माझ्याप्रमाणं सौभाग्याला आंचवलेल्या हतभागीनींना सांगा कीं, तुमच्या सौभाग्याबरोबर, तुमच्या शीलाचा टिळा गमावून पापाची पंढरी पिकवूं

नका ! कारण तुमच्या सारख्या तपस्विनी म्हणजे दुर्बल पौरुषांत पुरुषार्थाचा संचार करणाऱ्या अनाथ राष्ट्रदेवतेच्या मूर्ती आहेत ! लक्षांत ठेवा कीं, मंगलाचं मूळही मंगलच असलं पाहिजे. झाली, माझी तळमळ शांत झाली. आनंद–आतां मलाही आनंदच होतो आहे. बाबांनाही आनंदच झाला. तिकडचा प्राण आनंद–आनंद असंच म्हणत-नी ती पहा–ती पहा माझी जिवा भावाची मैत्रिण सुंदर--आनंदानंच मला बोलावीत आहे. आनंदा जाते मी ! रावसाहेब, भाऊराया रामचंद्रराव–आनंदाच्या रूपानं माझ्या या लोकींचा आनंद आपल्या स्वाधीन करून–माझ्या स्वर्गीय आनंदाकडं जाते–आई ! जन्मभूमि या पोरीला विसरूं नकोस ! आनंद–आनंदा— ( मरते. )

( रावसाहेब तिचें मस्तक उचलून धरतात. )

रावः––अरेरे ! देवा ही शुक्राची चांदणी शेवटीं अशी एकाकीच मावळली ना ?

आनंदः––आई–आई आतां मी काय करूं ? ( तिच्याजवळ जातो. रामचंद्र त्याला सावरतो. )

रावः––देवा कायरे केलंस हें ?

आनंदः––आतां माझ्या आईला मी कुठें हो पाहूं ?

रावः––हृदयांत! बाळ आपल्या हृदयांत आतां या देवीला पहायचं. प्रत्येकाच्या हृदयमंदिरांत या अंबिकेची मूर्ती आतां उभी राहील !

आनंदः––माझी आई मला एकट्याला टाकून खरंच कां हो गेली ?

रावः––नाहीं बाळ तुझी आई गेली नाहीं; तर देशाची ही पवित्र पुण्याई आज संपली ! आपली वैभवदेवता आज आपल्यांतून निघून गेली ! या भरत खंडांतल्या तेहतीस कोटी देवांच्या अश्रुमणिमाला या साम्राज्ञीच्या गळ्यांत आतां पडतील. या विक्रम देवतेचा गौरव करण्याकरतां प्रत्यक्ष भगवान् लक्ष्मीपती आपली दिव्य वैजयंती हिच्या गळ्यांत घालील, पण ही भाग्यलक्ष्मी देवाच्या दरबारांत गेली ती कायमची !

( पडद्यांत जयघोष, तुताऱ्या )

( पडद्यांत–हेस्टीः–ओ देखो रावशाप. रश ऑन् ! रन. )